


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# यंत्रसामुग्रीच्या अधिकाधिक कारखानदारांचीं

# विश्वसनीय

किर्लोस्कर

डिझेल एंजिनें



टाइप एव्ही १ आणि झेव्ही १
५ ते ७.५ हॉर्स पॉवर



टाइप एव्ही २ आणि झेव्ही १
१० ते १५ हॉर्स पॉवर











टाइप वी ४   ४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए, हवेनें थंड होणारी
१७ ते ६४ हॉर्स पॉवर.







देशांत तयार होणाऱ्या, पुढील कितीतरी प्रकारच्या यंत्रसामुग्रीच्या बाबतींत हमखास शक्ति पुरवठ्याचें साधन म्हणून किर्लोस्कर एंजिनें विश्वासास पात्र ठरली आहेत – काँक्रीट मिक्सर्स, कॉम्प्रेसर्स, टार मिक्सर्स, रोड रोलर्स, पंप, क्रशर्स, जनरेटर्स इत्यादि.

सर्वश्रेष्ठ दर्जा आणि कितीहि खडतर परिस्थितींत कोणत्याहि कटकटीवांचून उत्तम कामगिरी या त्यांच्या गुणांमुळें यंत्रसामुग्रीचे अधिकाधिक कारखानदार ही एंजिनेंच प्रथम पसंत करतात.

## किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड

रजिस्टर्ड ऑफिस : एल्फिन्स्टन रोड, पुणे-१ (भारत)

भारत सरकारचें १९६५ चें श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक



✻

वर्ष २१ वें

जुलै १९६५

मूल्य १ रु.

✻

# दीपावली

साहित्य, कला, संस्कृति

## श्रेयनामावली—

- **प्रवासवर्णन :** केवळ प्रवास नाहीं तर "माणूस" गवसेल –**"शिवा राणीच्या शोधांत"**– दिलीप पु. चित्रे, ● **चालू कादंबरी :** निर्जन बेटावरच्या दोन माणसांची कथा **"देवाला डोळे असतात"** अनु. प्र. श्री. नेरुरकर.
- **चार कथा :** स्वतःची लग्न पत्रिका हातीं घेऊन ती 'फॅक्ट्' शोधूं लागली ( **फॅक्ट्**– ना. व्यं. देशपांडे ) सत्काराच्या हारांत बबन बुडून गेला (**पहिला नंबर झिंदाबाद**–दि. त्र्यं. कुलकर्णी) "लष्करी" काकांची 'हुकुमी' बायको ( **माझ्या काकीची कहाणी**–प्र. श्री. नेरुरकर ) माझी बायको 'भलतीच' सामाजिक झाली तिचीच कथा (**माझी सामाजिक बायको**–प्रतिभा सबनीस)
- **ललित निबंध : "सूर्य वेचणारी कोंबडी"**–ले. वा. रा. कांत
- **खास प्रासंगिक लेख : गौहत्तीची प्राच्य विद्या परिषद्** — ह. शि. उर्सेकर, **उमलत्या अर्थव्यवस्थेत जाहिरातींचे स्थान**--मयूर ● **खास कविता : दार (शब्दकोशासाठीं)** प्राचार्य **पु. शि. रेगे, उमाकांत ठोमरे,** ह. शि. **खरात, यशवंत** देव, स्फुल्लिंग–दामोदर नाईक. याशिवाय सन्मानपुष्पें, दीपमाला, पानपुरी, कोंबडीशिवाय उरूसच नाहीं, उटींत **सिंहच सिंह** वगैरे वाचनीय मजकूर व हास्य स्फोटक व्यंगचित्रें

**दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

ट. नं. ७७७६५

Gram : Dalalart

✿ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay–4.



अनुक्रमणिका

# नभ मेघांनीं आक्रमिले

आकाशांत मेघ दाटून आले आहेत. दिशा अंधारल्या आहेत. अधुन मधून आकाशांतली म्हातारी विजेच्या जात्यावर मोठ्यानें दळण दळते आहे. तिच्या दळणाचा आवाज ऐकून पृथ्वी हादरते आहे. चातकाची तृप्ति पिऊन सृष्टि न्हाऊन निघाली आहे. ग्रीष्माचा दाह सहन करून शिणलेली पृथ्वी तृप्तीचे, शांतीचे निश्वास टाकते आहे. आकाशांतल्या म्हातारीच्या दळणाला जणुं साथ करण्यासाठींच कीं काय वेदोनारायण बेडकांचे वेदपठण चालू आहे. सर्वत्र बरसात चालूं आहे. ग्रीष्म सरला, ताप सरला, आग विझली, नेत्रांची जळजळ कमी झाली. अंगातून निघणारे वाफेचे कढत घुमारे शांत झाले. सृष्टि न्हाण्याचा, बहरण्याचा हा काळ आला आहे. आतां सर्वत्र हिरवळ नांदेल, तृप्ति नांदेल. नवी नवी पालवी फुटेल. झाडांना, फुल झाडांना, जणुं चराचर सृष्टीला नवें सौंदर्याचे लेणें मिळणार आहे. हे काळवंडलेले आकाश निराशा वा अंधार लेवून आलेले नाहीं. मेघांचे पतन हें पतन नाहीं, तर स्वतःचें सर्वस्व देऊन जीवन फुलविणाऱ्या कर्मयोग्याचा तो महायज्ञ आहे. ढग नाहीसे होतील. त्यांतून बरसणाऱ्या जलधारा मातींत मिळून जातील त्या दोघांचें अस्तित्व सरेल. पण त्यांतून एक फार मोठें अस्तित्व उभें राहील. तें देणें कधीं वांया जात नाहीं. जाणार नाहीं. मरून जाऊन अमर करणारी ही कि्रया आहे. सृष्टीचा हा संसार नेहमीं हरा भरा होण्यासाठीं कुणींतरी असं गाडून घेतलं पाहिजे. स्वतःचं अस्तित्व विसरून नवनवीन लेणें तिला चढविले पाहिजे. लौकिक दृष्टया अंधार स्वीकारून ही प्रकाश पूजा बांधलीच पाहिजे. कारण ही पूजाच अखेरीस ह्या सृष्टीतील चराचरांचे मंगल घडवून आणणार आहे. आज विज्ञानानें दाखविलेल्या प्रकाशानें ह्या सृष्टीची मंगल पूजा बांधण्याचे ऐवजी विज्ञानाची कुऱ्हाड हातीं घेऊन सारे वॉशिंग्टन आपापल्य बागाच उजाड करायला निघाले आहेत. आज जलदांच्या आत्मबलिदानानें न्हाऊन निघालेल्या सृष्टीच्या यशाची गीतें गायच्या ऐवजीं ते तिच्या विध्वंसनाचीं स्मशान गीतें गात आहेत. हें रमणीय, बहरलेलें, सुगंधानें नटलेलें तृप्त जग त्यांना मोहवीत नाहीं, तर त्यांच्या मनावर स्वार झाले आहे पिशाच्च ! ह्या पिशाच्याच्या तावडीतून ह्या वॉशिंग्टनांची मुक्तता केली पाहिजे. त्यांच्या हातांतल्या कुऱ्हाडी काढून घेतल्या पाहिजेत. आणि चराचरांत भरलेल्या रंग, रूपाचें, नादांचे, रसांचे, भावनांचे सौंदर्य पहाणारी एक नवी दृष्टि त्यांना दिली पाहिजे. क्षणाक्षणाला नवें रूप घेणारी ही निसर्गाची किमया त्यांना दाखविली पाहिजे. काळयाकुट्ट आकाशांत जमलेल्या व सृष्टीवर 'माया' बरसण्यासाठीं धडपडणाऱ्या ह्या मेघांची आणि त्यांची दोस्ती करून दिली पाहिजे. त्यांच्या आत्मयज्ञांतील उदात्ततेचा, मरणांत दडलेल्या अमरतेचा अर्थ त्यांना समजावून दिला पाहिजे. इथें क्षणाक्षणाला स्वतः मरून सृष्टीला नवजीवन देणाऱ्या शक्तीचा त्याला परिचय करून दिला पाहिजे. फुलें फुलतात - सुगंध वितरतात - तुमच्या आमच्यासाठीं ! वासानें तुम्हीं तृप्त झालांत कीं, सायंकाळीं तीं मरून जातात. लहानशी बी स्वतःला गाडून घेते आणि तुम्हीं फळांचे धनी होता. पहांटे पक्षीगण भूपाळी गात हिंडतात तुमच्यासाठीं ! ही सारी सृष्टि जें जें रमणीय आहे तें तें देऊन टाकते आहे आणि तरी तिचा 'अमरकोश' रिता होत नाहीं. कां ? त्यामागें उभें आहे एक तत्वज्ञान ! देऊन न सरणारे आहे तें दान (आणि धन) 'मरणांत खरोखर जग जगतें' हें आहे तें तत्वज्ञान !

आकाशांत मेघ दाटले आहेत. सृष्टीला सुंदर करण्यासाठीं ! तुमची तगमग थांबविण्यासाठीं ! तुमच्यावर 'माये'चा वर्षाव करण्यासाठीं ! तुम्हांला 'जीवन' देऊन तुमचें जीवन जगविण्यासाठीं त्यांच्यांत 'मृत्यू'ची अहमहमिका लागली आहे. पहा कसे आसुसले आहेत ते आत्मयज्ञासाठीं !

ह्या कर्मयोग्यांना आपण अभिवादन करूं या.

—संपादक





**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ — तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.











## भलतेच समरस !

स. न. वि. वि.

'राजमाता जिजाबाई'च्या पहिल्या प्रयोगाचे वेळी भाषण करतांना श्री. पु. ल. देशपांडे म्हणाले "पुरंदरे शिवचरित्राशी इतके समरस झाले आहेत कीं, आग्र्याहून सुटल्यानंतर महाराज ज्या मार्गानें दक्षिणेत आले त्याच मार्गाने पुरंदरे मुद्दाम चरित्र-रेखनापूर्वी राजगडापर्यंत आले, एक शंका आहे, तेंही पेटाऱ्यामधूनच आले का ?

आपला

दादर मनोहर माधव आळतेकर

## छोटासा दिवाळी अंकच !

स. न. वि. वि.

'दीपावली'चा जूनचा 'विशेष कथा' अंक मिळाला. अंक वाचला. तबियत एकदम खुष. हा छोटासा दिवाळी अंकच वाटला.

'दीपावली'ला छपाई आणि सजावट ह्यावद्दल श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळाल्या-वद्दल आपले मनःपूर्वक अभिनंदन.

मुलुंड दि. श्री. कराडकर

## प्रगत सौंदर्यदृष्टीचा विजय

रसिकमान्य 'दीपावली'ला राजमान्यता मिळाल्याचे वाचले. फार आनंद झाला. दिल्ली दरबारचे श्रेष्ठ गुणवत्ता प्रमाणपत्र हे आपल्या प्रगत सौंदर्यदृष्टीचा विजय आहे. दीपावलीची अशीच भरभराट होवो!

मुंबई दत्ता गांगनाईक

## सिंहाचा वांटा आपलाच

स. न. वि. वि.

आज आपला दीपावलीचा जूनचा कथा विशेषांक वाचायला घेतला. तो आपल्या दीपावलीने दिल्ली दरबार गाजविल्याचे वृत्त वाचले आणि खूप आनंद झाला. त्याबद्दल आपलें मी मनःपूर्वक अभिनंदन करतो. या यशांत आपण दीपावलीच्या लेखक, वाचक हितचिंतक व विज्ञापनदाते यांना सामील केले आहे. यात आपला मोठेपणा दिसून येतो. परंतु सिंहाचा वाटा हा आपलाच आहे हे निर्विवाद होय.




आपणास मिळालेल्या श्रेष्ठताप्रमाण पत्रवाद्दल मी व कुटुंबीय मंडळी आपले मनःपूर्वक अभिनंदन करतो व दीपावलीच्या संपादक कलावंत निर्मात्यास यापेक्षाही मोठा असा बहुमान मिळो अशी परमेश्वरा-जवळ प्रार्थना करतो. आपला अंक सर्वच-दृष्टया चांगला आहे.

आपला हितेच्छु

अहमदनगर र. ब. केळकर

## सार्थ विश्वास

स. न. वि. वि.

आपला दीपावलीचा जूनचा "विशेष कथा" अंक वाचला. मन प्रसन्न झाले. संपादकीयमध्ये आपण व्यक्त केलेला विश्वास अनाठायी नव्हता हे तुमच्या कानावर घालण्यासाठींच या पत्राचे प्रयो-जन आहे.

आपण या अंकाला कथा विशेषांक न म्हणता "विशेष कथा" अंक म्हणून संबो-धण्यात फारच कल्पकता दाखविली आहे, त्याबद्दल आपलं अभिनंदन! कारण सर्वच कथा आपापल्या वैशिष्टयाने विशेष आहेत. विचाराला खाद्य, वाचायला मनोरंजक आणि उच्च पातळीवरच्या आहेत. त्या तशा उत्कृष्ट सादर करणाऱ्या साऱ्याच लेखकांचेहि अभिनंदन केल्याशिवाय राह-वत नाही.

मला त्यातल्या त्यात खूपच आवडलेल्या दोन कथा म्हणजे "रियाझ" आणि "लव्हाळी वांचती."

एकंदर साराच अंक वाचनीय व आक-र्षक झाला आहे.

विविधतेने नटलेले अंशात्मक विश्व वाचकासमोर ठेवण्याचा जो आपण प्रयोग केला आहे तो यशस्वीच नव्हे तर अभिनंदनीय आहे.

हीच पातळी पुढेही टिकून राहील. अशी आशा व्यक्त करून पत्र पुरे करतो.

आपला

विलेपार्ले (पश्चिम) माधव बोडकर

## उल्लेखनीय, चांगलें

स. न. वि. वि.

दीपावली मासिकाचा मी नियमित वाचक आहे. "विशेष-कथा अंक आवडला. मासिकाच्या एकूण स्वरूपासंबंधीं थोडक्यांत लिहित आहे.

☆ **खास लेख** :– "सृष्टीला पडलेले रुपेरी स्वप्न" उल्लेखनीय वाटतो.

☆ **कथा**— संपादकीय लेखांत लिहिल्या-प्रमाणें "घटा घटांचे रूप आगळे" आहे यांत शंका नाही. आपल्या मासिकांतून नवोदितांनाही वाव मिळतो ही गोष्ट चांगली आहे.

☆ **मुलाखत** – "आम्ही असे लिहितो" ह्या मालेंतील पांचवी मुलाखत विभावरी शिरुरकर यांची आहे. मुलाखतींत विचार-लेले प्रश्न सुसंगत व जिज्ञासापूर्ण वाटतात. या मुलाखतीसंबंधीं एक ! दोन गोष्टी सुचवूं इच्छितो.

(१) लेखकांच्या कौटुंबिक जीवनाची वाचकांना जिज्ञासा असते. तसे एक-दोन प्रश्न असावे.

(२) लेखकाचे कांही साहित्य अनु-वादित झाले किंवा काय ?

(३) साहित्यावर मिळणाऱ्या पारि-श्रमिकाबद्दल अनुभव.

☆ **सन्मान पुष्पें** –– ह्या अंकांतील सन्म-पुष्पें अतिशय उद्‌बोधक वाटतात. लेखकाची श्रद्धा, जिव्हाळा, नम्रता जागो-जाग दिसून येते. सामान्यपणे नट-नटचांची तीच ती माहिती पुरविण्यापेक्षां ही **सन्मान-पुष्पें** समाजाला अतिशय उपयुक्त आहेत.'

आपला

ठाणें तु. मो. साळी



अनुक्रमणिका








**त्यांनीं तिला 'फॅक्ट्' म्हणजे काय हें चांगलं समजावून दिलं होतं. त्याच्याच आधारावर आतां ती उभी राहणार होती. संसार करणार होती ! फॅक्ट् ! फॅक्टच नाहीं का ही ?**

# फॅक्ट

—ना. व्यं. देशपांडे

**समोर** निमंत्रणपत्रिकांचा ढीग पडला होता. पाकिटांवर निमंत्रितांचे पत्ते लिहून लिहून गिरिजा कंटाळून गेली होती. वांकड्यातिकड्या अक्षरांत कसेबसे पत्ते खरडीत होती. कोर्टांत आरोपी लोकांचे अर्ज खरडून खरडून तिचें अक्षर पार विघडलें होतें. ठराविक नमुन्याचे अर्ज. त्यांत नाविन्य कसलें नि रचना तरी कसली ?

लिहितां लिहितां तिनं पेन बाजूला ठेवलं. आपलीं बोटं शाईनं डागळलेली होती. शिवाय बराच वेळ पेन बोटामध्यें दाबून धरल्यामुळें पेनच्या गळ्यापाशीं आलेल्या कंगोऱ्याचा स्पष्ट ठसा तिच्या मधल्या बोटाच्या बाजूवर उमटला होता. तिनें हळुवारपणें त्यावर फुंकर मारली. तेवढेंच बरें वाटलें तिला. पत्ते लिहिण्याचें अंमळ थांबवून ती खिडकीबाहेर पाहूं लागली.

कचेरीस जाण्याची वेळ होती. रस्त्यावर माणसांचे नि वाहनांचे विविध प्रकारचे आकृतिबंध निर्माण होत होते. रस्त्याच्या कॅलिडियास्कोपचे नळकांडे वरचेवर फिरत होतें. क्षणोक्षणीं बदलणाऱ्या आकृतिबंधाकडे पाहतां पाहतां गिरिजा स्वतःला विसरली. एक बिंदु—-एक लहानसा तुकडा होऊन त्यांत मिसळून गेली. आपणही या आकृतिबंधांतील कांचेचा एक छोटासा तुकडा ! आपली छोटीशी मोटार घेऊन या जनसंमर्दांत मिसळलों कीं नवीन एक आकृतिबंध......

"बाई. . ."

तिची तंद्री भंग पावली.

"अं ऽ " तिनें वळून पाहिलें.

काणा विष्णु तिला कांहीं विचारण्यासाठीं आंत आला होता. काणा विष्णु हा तिचा म्हटला तर कारकून म्हटला तर टाऊट् होता. कारकुनी, वकीलपत्रावर अशीलांचे अंगठे उठवून घेण्यापुरतीच. अशीलें आणून पुरवायची आणि दोघांकडून कमिशन खायचें हा प्रामाणिक धंदा ! त्याचा एक डोळा तिरळा होता म्हणून त्याला सर्वजण काणा म्हणून ओळखीत. कांहीं आरोपी तर त्याला चक्क वकीलसाहेब म्हणत.

"बाई त्या ५४४ मध्यें काय करायचें? केस उभी रहाणार या खेपेस."

"कोणती केस बरं ती ?..." डोळे बारीक करून तिनें नेहमीच्या पद्धतीनें विचारलें.

"अवं ती तंगवेल्ली मारिमुनु ? हातभट्टीची नाहीं का केस ?. . . . ती हो बिनचोळीची बाई ?" काणा विष्णु फिदी फिदी हंसला.

एवढा बारीक तपशील दिल्यानंतर तिला न आठवणं अशक्यच होतें.

"हं. .. . हं. . . आठवलं. एक तारीख घेऊन टाक. अजून साक्षीदार फोडायचे आहेत. त्या बाईनं पैशाची अजून व्यवस्था केली नाहीं. तिला घरीं येऊन जायला सांग.."

"बरं ! बरं" असं म्हणून काणा विष्णु पाय फरफटत चालायला लागला.

"आणि हें पहा.." तिनें त्याला परत बोलावलें. "दोन हप्त्यांची तारीख घे हं... मध्यंतरी कोर्टांत जायचं जमायचं नाही मला. . . " समोरच्या पत्रिकांकडे पहात म्हणाली.

"समजलं...समजलं..." पुनः फिदी फिदी हंसत काणा विष्णु परतला.

तिच्या मनाच्या गोलघुमटांत त्याचं फिदी फिदी हंसणं सात वेळां घुमलं... 'समजलं' 'समजलं.'... काय समजलं त्याला ? ती एकदमच दचकली... आजवर त्याचं फिदी फिदी हंसणं मनांत घुमलं नव्हतं. आपलं त्याकडे लक्षही गेलं नव्हतं. मग आज कां असं ? काय समजलं त्याला ? आपल्या मनांतले विचार ? दररोज कितीतरी पुरुष आणि स्त्रिया तिच्या सान्निध्यांत येतं. कोर्टातले कारकून, पट्टेवाले सोडाच. पण आरोपी लोक खटल्याची माहिति देण्यासाठीं येत तेव्हां पुष्कळ वेळां लगटून जात. आपले घाणेरडे दारूच्या वासाचे निश्वास तिच्या अंगावर फेंकीत, बलात्कार करणाऱ्या वखवख-णाऱ्या नजरेनें तिला नागडी उघडी करीत. तिला त्याचं कांहीं वाटत नव्हतें. त्या साऱ्या संवेदना आतां बधीर झाल्या होत्या. ऑपरेशन करतांना रक्तवाहिन्यांतून रक्त वाहूं नये म्हणून कापतां कापताच त्यांची तोंडं बंद करतात, त्याप्रमाणें प्रसंगा-प्रसंगानें, अनुभवानें, अधिक अनुभवानें तिच्या संवेदना बधीर होऊन गेल्या होत्या. तशा बधीर झाल्याशिवाय असल्या कोर्टांत पाऊल टाकतां येत नाहीं. पैसे मिळवितां येत नाहींत. काण्या विष्णूच्या फिदी फिदी हंसण्याचा राग करतां येत नाहीं. आरोपीला खडसावून विचारतां येत नाहीं....

पण आज मात्र काण्या विष्णूचे फिदी फिदी हंसणें तिला पहिल्यांदा जाणवलें...

मग तिनं एक पत्रिका सहजगत्या उचलली. त्यावरील 'एस्. गोपीनाथराव' या अक्षरांवरून ती पुनः पुनः बोटें फिरवूं लागली. जणू त्यांच्या शरीरावरून बोटें फिरवीत होती. अंदाज घेत होती. आडाखे बांधीत होती. तुळून पहात होती. दारु जुनीच प्यायची होती. फक्त नव्या भांड्यां-तून प्यायची होती. धुंदी नव्यानें चढायची नव्हती. केवळ संवय म्हणून, व्यसन म्हणून घ्यायची होती.

एस्. गोपीनाथराव. आंध्र प्रदेशांतून इकडे अलिकडेच स्थायिक झालेला एक वकील. एका केसच्या निमित्तानें झालेला परिचय. नेहमीप्रमाणेंच भटकणें, हॉटेलांत जाणें, सिनेमा पहाणें, अगर एकाद्या कॉटेजमध्यें रात्र घालवणें या पलीकडे त्याची दृष्टि नसेल असेंच गिरिजेला वाटलें होतें. पण थोडयाशा परिचयानंतर त्यानें मागणीच घातली तेव्हां गिरिजा आश्चर्य-चकित झाली होती. हुरळून मात्र गेली नव्हती. त्यानें तिचा रुकार विचारला. तिनं एकदम दिला नाहीं. तिला त्यावर विचार करायचा होता. फायद्या तोट्याचा हिशोब घालायचा होता. अगदी संथपणें विचार करायचा होता. तिनें पस्तीशीचा उंबरठा ओलांडला होता. तिला आतां लग्न करायचं होतें. कोठेतरी विसाव्याला टेकायला हवं होतं...एक लौकिक गरज होती. एक फॅक्ट् तिच्या आयुष्यांत यायची होती. यायला हवी होती. फॅक्ट ! फॅक्ट् !.. तिनं एस्. गोपीनाथरावाच्या राकट, बळ-कट बोटांकडे पाहिलें. अन् एक दिवस रुकार देऊन टाकला होता. तीच फॅक्ट् त्या आमंत्रण पत्रिकांमध्यें छापली होती. तीच फॅक्ट् जगाला जाहीर करावयाची होती. लग्नाची फॅक्ट् !

—फॅक्ट्चा अभ्यास कसा करावा हें शिकवावं वसंतराव जोगळेकरांनीच ! त्यांच्याकडून तिनं धडे घेतले होते.

आपलं लग्न ठरल्याचं ऐकून काय वाटेल त्यांना ? आनंद, सुटकेचा ? असूया.. कां आणखीन् कांहीं ? कां कृष्णानें वर्णि-लेली स्थितप्रज्ञता ?...होय. तेंच खरें. जोगळेकर वकील जग ओळखणारे आहे. व्यवहार जाणणारे आहेत. त्यांच्या काना-वर ही गोष्ट अगोदर न घातल्याबद्दल त्यांना कांहींही वाटणार नाहीं. नेहमींच हास्य तोंडावर खेळवीत ते 'कॉंग्रॅट्स्' म्हणतील. त्यांना तरी आतां जरुरी कोठे आहे ? गिरिजा आपला वकिलीचा स्वतंत्र व्यवसाय गेली सहासात वर्षें करीत होती. स्वतःच्या पायावर उभी होती. आतां वेळोवेळीं त्यांचा सल्ला घेण्याची जरूर नव्हती, त्यांच्या खोलींत पाऊल टाकण्याची जरुरी नव्हती.

त्यांची खोली ! त्या खोलींत कांहीं क्षणांत ती एकदम मोठी झाली होती... अनुभव मिळविला होता...व्यवहार शिकली होती. फॅक्टस्चे धडे घेतले होते.....

फौजदारी खटल्यांत निष्णांत असलेल्या जोगळेकर वकिलांच्याकडे असिस्टंट म्हणून जायचें तिनें ठरविल्यानंतर कित्येकांनीं तिचें अभिनंदन केलें होतें तर कित्येकांनीं सावधगिरीच्या सूचना केल्या होत्या. पण विरोधकांच्या सूचना सत्ताधाऱ्यांनीं फेटा-ळाव्यात तशा गिरिजेनें फेटाळून लावल्या होत्या. तिला जगाचा अनुभव घ्यावयाचा होता. सर्वकष अनुभव घ्यावयाचा होता. आणि वकिलीच्या व्यवसायाशिवाय कोण-त्याही व्यवसायांत असा अनुभव मिळणार नाहीं असें तिचें ठाम मत झालें होतें.

तसें पूर्वी जोगळेकरांना तिनें पुष्क वेळां पाहिलें होतें. कोर्टांत खटले चालवतांना, साक्षीदारांची उलटतपासणी करतांना, प्रतिवाद करतांना. त्यांची उलटतपासणीची पद्धत, सफाईदार इंग्रजी वक्तृत्व आणि बिनतोड युक्तिवाद या गोष्टीमुळें तरुण नवखे वकील भारून जात. सर्वांशीं गोड बोलण्याची पद्धत, रुबाबदार व्यक्ति-मत्व.... यामुळें त्यांच्या प्रत्येक बोलण्या-भोंवतीं, हालचाली भोंवतीं एक प्रकारचें मोहक वलय निर्माण होई. एखादेवेळीं साक्षीदारास विचारलेला प्रश्न अगदीच मामुली असे. पण ते अशा रीतीनें तो विचारीत, त्याची फेंक अशा रीतीनें करीत

कीं ऐकणारास व खुद्द साक्षीदारास वाटायचें कीं त्यांत कांहींतरी गोम आहे.

अशा जोगळेकरांच्या ऑफिसमध्यें गिरिजेनें, नववधूसारखें भीतभीत पहिल्यांदा पाऊल टाकलें होतें. सकाळची वेळ होती. जोगळेकर नुकतेच ऑफिसमध्यें येऊन बसले होते. त्यांच्या रुबाबदार व्यक्तिमत्वामुळें त्यांच्या कडक इस्त्रीच्या शर्ट पँटला कधी नापसंतीची सुरकुती पडलेली दिसायची नाहीं. त्यांच्या ट्रि युनाइज्ड कॉलरच्या मध्यभागी कुशल हातांनीं मारलेली नेकटायची गांठ... त्यांत कधीं चूक घडायची नाहीं.

ऑफिसमध्यें अद्याप दुसरें कोणी आले नव्हतें हें पाहून तिला हायसें वाटलें.

'या....' जोगळेकरांनीं हंसून तिचें स्वागत केलें.

त्यांच्या हंसण्यानें गिरिजा भारून गेली. तिचें लक्ष त्यांच्या कानशिलावरील किंचित् करड्या झालेल्या केसांकडे गेलें. चेहेऱ्यावरील तरतरी आणि ते करडे केस यांच्यातली विसंगती जाणवली. जोगळेकर तिच्याकडे रोखून पहात होते. हत्यारांचा उपयोग करण्यापूर्वी शिल्पकार आपल्या समोरील दगडाकडे न्याहाळून पाहतो तसे जोगळेकर तिच्याकडे पहात होते.

"मला विवलकरांनीं सांगितली तुमची इच्छा... माझी कांहीं हरकत नाहीं..." असं म्हणून जोगळेकरांनीं आपली फिरती खुर्ची गर्कन् फिरवली.

गिरिजेच्या तोंडावरचा आनंद त्यांनी तीक्ष्ण नजरेनें टिपून घेतला. नवीन अनुभवांना ती साद घालीत होती. तो तिला येऊन भेटणार होता. निरनिराळ्या स्वभावाची माणसें ती पाहणार होती, त्यांची ओळख करून घेणार होती, लाजाळूपणाचें कवच फेंकून देणार होती, पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून, सत्यासाठीं, न्यायासाठीं, न्यायालयांत झगडणार होती. कांहीं अननुभूत कल्पनांनीं ती पुलकित झाली.

जोगळेकरांनीं तिच्याकडे एकवार टक लावून पाहिलें. एकाद्या पांढऱ्या शुभ्र कागदाप्रमाणें तिचा चेहरा निर्व्याज आणि टवटवीत दिसत होता.

आपल्या टेबलावर पडलेल्या पांढऱ्या शुभ्र तावावर तांबड्या पेन्सिलीनें रेघोट्या मारीत ते व्यवसायाबद्दलची माहिती सांगूं लागले.

"हे पहा मिस्. . . . "

"मला गिरिजा म्हणून हांक मारली तरी चालेल. आवडेल मला तें."

जोगळेकरांनीं जाणीवपूर्वक स्मित केलें.

–आणि हें पहा. या व्यवसायांत नाना तऱ्हेचे लोक भेटतात. विशेषतः फौजदारी न्यायालयांतील वातावरण अगदीं वेगळें असतें. माणसें हात राखून बोलतात. एकमेकांना फसवण्याचा प्रयत्न करतात. माणसानें भावनाविवश होता कामा नये. अनेकवेळां आरोपी आपणांस अनेक खोट्या गोष्टी सांगतात. सर्वच विश्वासार्ह नसतात. नेहमी वास्तवाच्या कसोटीवर सर्व गोष्टी घांसून पुसून घ्याव्या लागतात.... ज्यूनियरनें घेण्याच्या श्रमाबाबत सांगायचें म्हणजे...तुम्ही केसमधल्या फॅक्टस् नीट समजावून घेतल्या पाहिजेत. पुनः पुनः कागद वाचायला हवेत. कोणी काय स्टेटमेंट दिलंय् याची टिपणें करून घेतली पाहिजेत. मुख्य म्हणजे काय, सुरवातीस फॅक्टस्वर लक्ष केंद्रित केलं पाहिजे—काय समजलं ?"

"आलं लक्षांत..." ओठावरील हंसूं लपवित गिरिजा म्हणाली.

–इतक्यांत कोणीतरी आलें अन् त्या दिवशीच्या कामाला प्रारंभ झाला. जोगळेकरांचीं नि अशीलांचीं संभाषणें ती लक्षपूर्वक ऐकूं लागली. जोगळेकरांची डिक्टेशन्स घेऊं लागली. टिपणें करूं लागलीं. कोर्टांत साक्षीदारांच्या जबान्या टिपून घेऊं लागली. जोगळेकरांच्या सांवलीप्रमाणें त्यांना सतत सोबत करूं लागली.

पहिल्या दिवशीं सायंकाळीं ती घरीं खिदळतच आली होती. तिला एक नवीनच शब्द शिकायला मिळाला होता. 'फॅक्ट्' !... त्याचा नवीनच अर्थ तिला समजला होता. इतके दिवस हा शब्द कित्येकदां येऊन गेला होता. पण आज तिला त्याचा साक्षात्कार झाला होता. जोगळेकरांनीं तिला समजावून दिलें होतें. आपण आहोत ही एक फॅक्ट ! जोगळेकरांच्याकडे जातो ही एक फॅक्ट् ! मी कोर्टांतून आले ही एक फॅक्ट् ! मी जोगळेकरांच्या बद्दल विचार करते ही एक फॅक्ट् ! फॅक्ट् ! फॅक्ट ! सारं जग फॅक्टस्नीं भरलें आहे ! किती अद्भूत नाहीं ? आजवर आपणाला समजलेंच नव्हतें. आणि जोगळेकरांची ती आवडती फ्रेज "Take care of facts and law will take care of you." हो ! खरेंच. फॅक्टस्ना आपण जपलं पाहिजे. भावना... कल्पना यांचा खेळ उपयोगी नाहीं. सगळीकडे या वास्तवदृष्टीनें पाहिले पाहिजे. जोगळेकरांच्या बुद्धिमत्तेबद्दलचा आदर एकदम वाढला.

जोगळेकरांच्याकडे नाना तऱ्हेच्या केसेस येत. मारामारी नि फसवाफसवीच्या केसेस् तर नित्याच्या. प्रथम प्रथम या मारामाऱ्यांच्या साध्या खटल्यांकडे ती कुतूहलानें पाही. किती असंख्य कारणें असत. दारूच्या धंद्यानिमित्त भांडणें, धंद्यांतील स्पर्धा,

[ पृष्ठ ५९ वर पहा ]

'वाद्‌नीं' कवळी घेतां......



अनुक्रमणिका

# सूर्य वेचणारी कोंबडी

--वा. रा. कान्त

**पाणी** वाहात जाते. ते आपण नेहमीच पाहतो. पण एखाद्या वेळीं, त्या पाण्यावरोबर आपले मनही वाहात जाते. हे मन पाण्यांत किंवा पाण्यासह, वाऱ्यानें, तसे वाहात जात नाहीं. छायाप्रकाशाने रंगलेल्या आणि पाहणाऱ्याच्या भाववृत्तीने तरंगित झालेल्या त्या पाण्याच्या 'वाहतेपणा'च्या प्रवाहांत, ते मन क्षणभर वाहात जाते. हे वाहतेपण म्हणजे त्या पाण्याचें, जलप्रवाहाचें एक वेगळे अस्तित्व. यालाच नवें कलात्मक अस्तित्व, किंवा वास्तव जगापासून भिन्न अशी पृथगात्म कलात्मक सृष्टि म्हणायचे. या नव्या कल्पनासंभूत वाहतेपणाच्या अनुभूतीने संवेदनाक्षम मन असे भारावून जाते कीं, ते त्या पाण्याला किंवा आपल्या मनाला (नक्की सांगणें कठिण आहे) कधीं विस्मयचकित होऊन तर कधीं भावनिर्भर होवून असें विचारीत राहते 'क्वं नेलयसि मे मनः' – कुठे नेत आहेस मला? कोणत्या जगांत, कोणत्या नव्या सृष्टींत ? हें नवें विश्व म्हणजेच काव्य, साहित्य किंवा कला यांची सृष्टि. ही सृष्टि वास्तव सृष्टिपासून निर्माण होते, पण ती स्वतः ती वस्तू नसते. पाण्यापासून निर्माण झालेले ते वाहतेपण म्हणजे पाणी नसते. ते पाण्याचे, त्याच्या अस्तित्वाचे केवळ कल्पनासंभूत 'असतेपण' असते. त्या पाण्यानें मन चिंब झाले तरी अंग भिजत नाहीं; त्या डोहांत बुडाले तरी प्राण गुदमरत नाहींत; त्या महापुरांत वाहून गेले तरी आपल्या हृदयाचा किंवा पायाचा ठाव सुटत नाहीं. उलटरिता रांजण भरल्या सारखी एक भावना होते. अवकाश, आत्मा कशाने तरी व्यापला आहे, भरून राहिला आहे, असे वाटते; आणि एका तृप्तीने व आनंदाने मनें आणि क्षणें भरून जातात, तुडुंब होतात. ही भावना काय आहे? आनंद कीं अनाम अपूर्णतेच्या परिपूर्तीचे समाधान? एक संभ्रम कीं भ्रमनिरास?

मला तर वाटते, कलात्मक संभ्रम हा भ्रमनिरासाचाच एक प्रकार आहे, एक स्वरूप आहे. या संभ्रमातून आणि भ्रमनिरासातून जीवनातल्या तिसऱ्याच गोष्टीची जाणीव होते. ही जाण आपल्याला जीवनातील वास्तवतेच्या, सत्याच्या एका वेगळ्या अंगाचे, परिणामाचे दर्शन घडविते आणि त्यावरोबरच आपल्याला सुरक्षिततेचाही दिलासा देते. त्यामुळें या संभ्रमाचे, फसवेपणाचे आपल्याला दुःख होत नाहीं. इथे त्या पाण्याचेच उदाहरण पुनः घेऊं. पाण्याचे वाहतेपण किंवा ओलावा यांच्या स्मरणाने किंवा कल्पनेनें निर्मिलेला पुनःप्रत्यय हा एक संभ्रम आहे, फसवे इंद्रजाल आहे. परंतु त्याचे आपल्याला वाईट वाटत नाहीं. कां? ज्या संभ्रमप्राप्त अनुभवातून, कल्पनासंभूत असतेपणातून, पाण्याच्या वास्तवतेचे एक वेगळेच स्वरूप आपल्या प्रत्ययाला येतें. त्या कल्पनाप्राप्त वाहतेपणातून पाण्याच्या जीवनाच्या गतीची जाणीव होते, त्याच्या सजलतेंत कुठल्यातरी सुखद शीतल स्पर्शाची मोरपिसें शिवून जातात, आणि जलपृष्ठावरील छाया प्रकाशाच्या रंगविलासात कुणातरी डोळ्यातल्या ऊन-सावल्या, आशा-स्वप्नें प्रतिबिंबित झाल्याचा आपल्याला भास होतो. जीवनांत अनुभवास येणाऱ्या प्रीतीच्या, करुणतेच्या, दुःखाच्या, सुखाच्या, जगण्याच्या, मरणाच्या या अनुभूतीमागे वसणाऱ्या वास्तवाला इथें वेगळे स्वरूप लाभते; आगळे परिमाण लाभते. मेंदीनें नखें रंगविणारी तरुणी अंगरागाच्या स्पर्शानें सौंदर्याच्या, शृंगाराच्या आणि प्रणयाच्या एका वेगळ्या सृष्टींत जाते, रमते. ती अशाच कांहीं किमयेने. कलासृष्टीतील अनुभवही असाच, एकाचवेळी तृप्त आणि पर्युत्सुक.

वस्तुगत सार (essence) आणि व्यक्तिगत संवेदना यांना बदलत्या स्थलकालाचा जेव्हां छेद जातो तेव्हां तो जो विशिष्ट भावानुभव निर्माण होतो, त्यातून या भावविश्वाची रचना होते. गणिताच्या भाषेत असेंही सांगता येईल कीं वस्तुगत सार (essence of reality) आणि व्यक्तिगत संवेदना (Individual emotion) यांना बदलत्या स्थलकालाच्या रुपाने आणि धावत्या क्षणाच्या गतीने भागिले असता जो भागाकार येतो, तो भागाकार म्हणजे व्यक्तित्व आणि वस्तुत्व यांच्या द्वंद्वांतून सुमूर्त होणारी भावाकृति अथवा कलाकृति.

ही कलाकृति जशी त्या व्यक्तीचा व वस्तूचा आकार व 'भाग' घेवून येते, तशीच ज्या स्थलकालातून जन्माला आलेली असते त्याच्या मर्यादा फोडून, बंधने तोडून, सतत विशाल, असीम होण्याचा ती प्रयत्न करीत असते; आपले भागून आलेले व्यक्तित्व व वस्तुपण हारवून स्थल कालातीत होण्यासाठी ती धडपडत असते; अंड्याचे कवच फोडून बाहेर पडूं पाहणाऱ्या कोंबडीच्या पिलासारखी पहिल्यांदा अंडे फुटतें तेव्हांच दुसरे ब्रह्मांड दृष्टिसमोर निर्माण होते; फक्त त्या पिलाभोवती आणि त्या पिलांसाठी.





अनुक्रमणिका



## दार [शब्दकोशासाठीं]

बाहेर जातांना दार लावावें.
आंत आल्यावर दार ओढून घ्यावें.

दारांत उभे राहूं नये—उगाच;
पण दारापर्यंत पोंचवायला जावें.
दारांतून टा—टा करावें

दाराला फट असावी—दुसऱ्यांच्या,
कारण मग त्यांना आपले डोळे असतात—
आपल्या भितींना जसे दुसऱ्यांचे कान असतात.

दारावरून जावें, टाळण्यासाठीं आणि टेळण्यासाठींहि.

दार फोडतात ते डाकू असतात,
किंवा बंबवाले,
किंवा आंतून पुष्कळ वेळ उत्तर येत नाहीं म्हणून
आपले जागरूक शेजारी.

दार लावतात ते भित्रे,
उघडतात ते आपले मित्र,
उघडून देतात ते फितूर.

दार धाडकन् बंद करून बाहेर ठेवतात
ते आपले मालक;
क्वचित् सिनेमांतील प्रेयसी—
आंतल्या सुसज्ज खोलीच्या दाराआड
पलंगावर अंग टाकून
मुक्तपणें रडायला अवसर मिळावा म्हणून.

(आजूबाजूच्या उशा यावेळीं खूप मऊ असाव्यात.)
सिनेमांतील, गोष्टींतील.

दारांच्या बाबतींत
ठोठावा म्हणजे उघडेल
असें नेहमीं दडपून सांगत रहावें—
कोणत्याहि विवक्षित दाराचा विशेष उल्लेख न करतां

दारावर टिचकी मारावी, टक् टक् करावें
वेळ, प्रसंग आणि मूड यांचें भान ठेवून.
(दारहि चुकूं नये, आपल्या स्वास्थ्यासाठीं.)
दारापाशीं धरणें धरावें—
वेळ असल्यास,
आपला फोटो छापून येत असल्यास.

दाराशीं तिष्ठत रहावें, वरिष्ठांच्या, मंत्र्यांच्या.
त्यांच्या शिपायांशीं ओळख करावी, त्यांना बसूं द्यावें
कारण ते उठण्याची शक्यता नसते.

घर-दार सोडावें, सोडूं नये;
परंतु कांहींहि एक करतांना,
या बदललेल्या दाराची व्युत्पत्ति नीट लक्षांत ठेवावी
हें नेहमीं पुल्लिंगी अनेकवचनी असते—
संस्कृतांत बायकोची रास्त भीति लक्षांत घेऊन
घराला जोडलेलें.

दाराला कड्या असाव्यात, अडसर असावेत,
कुलुपें असावींत.
किल्ली विसरण्याची शक्यता नसल्यास
अंगचें आधुनिक लॉकहि असावें.

दार उघडें टाकूं नये;
टाकावेंहि,
कारण एखादा मेगॅस्थनिस त्यावर मग लिहितोहि
दार नीट लावावें–रात्रीं, असल्यास.

—पुरुषोत्तम शिवराम रेगे

---

ह्या अर्थानें कलाकृति ही कोंबड्यासारखी अंडज असली तरी त्या कोंबड्याप्रमाणें उकिरड्यावरील गारांचे कण ती वेंचीत नाही. ही कोंबडी सूर्य वेंचते—चोंचीने. असें सूर्य वेंचतांना अनेकदा त्या कोंबड्याची चोंच, पंख, सारे जळून राख होतात. परंतु मागाहून येणारी कोंबडीचीं पिलें त्या राखेंत नवीन सूर्य वेंचीत असतात हें सूर्यचयन म्हणजेच कला, कला निर्मितीची प्रक्रिया असें म्हटलें तर ते वावगे ठरेल काय? समुद्राच्या लाटांतून सूर्य वेंचणारे वगळे मर्ढेकरांनी आपल्या प्रतिभेने टिपले आहेत. तें या सूर्यचयनाचेंच प्रतिक मी मानतो.

परंतु हें फारच काव्यात्मक झाले, कदाचित न समजण्याइतकें रुपक दृष्टांताखेरीज काव्यात्मक भाषेशिवाय काव्यानंदाचे किंवा कलानंदाचें वर्णन करता येवूं नये ही त्याची शक्ति कीं, दुर्बलता? काय म्हणायचे? कीं ती लेखकाची व्यक्तिगत असमर्थता मानायची?

तें कसेंही असो एवढे मात्र खरे कीं, या सृष्टीची, तिच्या आनंदाची जातच वेगळी आहे. पूर्वी म्हटल्याप्रमाणें रिता रांजण भरल्यासारखी, 'रिते आकाश' असे म्हणत असतांनाही आपले हृदय, व्याकुळ करणाऱ्या एका उदासतेने, शून्यपणाच्या हुरहुरीने भरत असते. रितेपणा भरून काढणाऱ्या या भावनेची, आनंदरुपाची जाणीव उपनिषत्कालीन ऋषींनाही होती. उपनिषदांत असें म्हटलें आहे "कोऽह्येवान्यात् कःप्राण्यत् यदेश आकाशः आनंदोनस्यात्"– हे आकाश आनंदाने भरलेले नसते तर त्याच्या (छाये)खालीं एक तरी जीव जिवंत राहूं शकला असता काय? प्राणिमात्राला जिवंत ठेवणाऱ्या ज्या आनंदाचा साक्षात्कार उपनिषत्कारांना झाला, त्याच जातीच्या आनंदाचा अनुभव कलानिर्मितींत, कलासृष्टींत येतो असें म्हटलें, तर ते कुणालाच नाकारता येणार नाहीं. ***



अनुक्रमणिका

**मी स्वतः प्रातःकाळीं सूर्योदयानंतरच्या पहिल्या अर्ध्या तासांत**

( छायाचित्र–जॉर्ज स्माईथ )

# दिलीप पुरुषोत्तम चित्रे

## (८)

**"त्तज"** हें खास इथिओपियन मद्य आहे. तें मधापासून काढतात. त्यांत कांही वनस्पतिसुद्धां मिसळलेल्या असतात. जगांतल्या अत्यंत फसव्या पेयांपैकीं हें एक आहे. अतिशय मलूल गोडवा असलेलं, अजिबात न जळजळणारं, हें मद्य ग्लास दोन ग्लास प्यावं. तासाभरांत तें टांग मारतं. मी वेळेला बारा बाटल्या बिअर प्यालो आहे. अर्धी बाटली व्हिस्की पिऊन माझ्या दुप्पट ताकदीच्या ठाकूरबरोबर धांवण्याची शर्यत लावून जिंकलो आहे. (ठाकूर अर्ध्या रस्त्यांत गवतांत उताणा पडला आणि पंधरा मिनिटांनी म्हणाला कीं दारू प्यायल्यावर तडक बाई न गाठतां वेड्यासारखी शर्यत लावणं केवढं मूर्खपणाचं आहे हे अचानक ध्यानांत येऊन मुद्दामच त्यानें गवतांत लोळण घेतली आणि जन्नत-मधल्या मादक हुरींचा ख्याल केला. "बाहेरख्याली कुठचा !" मी म्हणालो.) क्वचित् थोडीशीच रम् पिऊन भडाभडा ओकलोसुद्धां आहे. पण त्तज ही गनिमी दारू ––ाळ आणि फसवी. दसायला सोनेरी पण केव्हां गाफील करून खजीर मारील याचा भरवंसा नाही.

मी प्रथम त्तज प्यायलों ती असेल्लांत वस्तीला असलेल्या अरुस्सीच्या गव्हर्नरनें गांवजेवण दिलं तेव्हां. आम्ही परदेशी पाहुणे, सरकारी जांवई, मानकरी. मोठ्या शामियान्यांत सर्वांना लवून "तेनास्तलीन" (ईश्वर तुम्हाला दीर्घायुष्य देवो !) असं म्हणत आंत शिरलों.



**[ एका आगळ्या प्रवास-वर्णनाचा दुसरा 'चटकदार' हप्ता ]**

रांगेनें मांडलेलीं मेजं आणि खुर्च्या. अंगावरले ओव्हरकोट (ओव्हर-कोट–विशेषतः काळा ओव्हरकोट – हें इथिओपियांतलं खानदानी-पणाचं लक्षण) न काढतांच आढ्यतेने बसलेले नागरिक सर्वत्र दिसत होते. आम्ही त्यांच्यांतच जागा पकडल्या. माझ्या शेजारचा माणूस अर्थखात्यांत काम करणारा होता. त्यानें आपली ओळख करून देतां देतां त्तजचा ग्लास भरून दिला. पण तो ओठाला लावण्यापूर्वी खास इथिओपियन पद्धतीचे नमस्कार-चमत्कार झाले. (नमस्कारापेक्षां ह्यांत चमत्कारच जास्त असतो.)

"तेनास्तलीन गेतेय्" (नमस्कार, रावसाहेब)
"तेनास्तलीन...."
"दहना नो ?" (बरं आहे न ?)
"इग्झ्याबिर इमस्गन्" (देवाची दया)
"इम्मेती दहनानाच्चु ?" (मालकीण बरी आहे न ?)
"इग्झ्याबिर इमस्गन् !"
"इसी तुरु नो ?" ('इकडे, बरं वाटतं नं ?')
"बताम, बताम, इथिओपिया तुरु नो. . . ." (वा, वा, फार, फार. इथिओपिया चांगला देश आहे). इ. इ. क्रमानें माझी, बायकोची, तेव्हां जन्मू घातलेल्या मुलाची, घरादाराची, हवापाण्याची वगैरे चौकशी करण्यांत त्यानें अर्धा तास केव्हांच घालवला. त्यांतून इथिओ-पियन माणूस अदब दाखविण्यासाठीं तीच तीच चौकशी दहादां करतो. म्हणजे उदाहरणार्थ "बरं आहे न ?" हा प्रश्न, हा संभाषणांत वाटेल तेव्हां वाटेल त्या जागीं उपटूं शकतो आणि प्रत्येकदां विचारणाराला सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या थोरवीची आणि कनवाळूपणाची आठवण करून द्यावी लागते. कित्येकदां मला वाटायचं कीं हे नमस्कार-चमत्कार लांबवल्यामुळेंच हा देश मागे पडलेला आहे. एखादा माणूस आपला खून करायला आला तरी केवळ नमस्कार-चमत्कारांत आपलं आयुष्य खर्चून टाकूं शकेल. त्याला सुरा काढावा लागणारच नाही.

ह्या सर्वांचा त्तजच्या त्या ग्लासशीं संबंध आहे. कारण त्तज पिऊन जी सुस्त नशा येते तिच्यांत मला हा चमत्कार चमत्कारिक वाटेनासा झाला. अर्ध्यापाऊण तासांत आम्ही दोन बाटल्या त्तज पिऊन चांगलेच तर्र् झालों. (गव्हर्नर मला कुठेच दिसला नाही !) मग इंजिऱ्याच्या गुंडाळ्या आल्या. इंजिरा म्हणजे इथिओपियन लोकांची भाकरी. ती तेफ् नांवाच्या बाजरीहून लहान पण बाजरीच्याच जातीच्या खास इथिओपियन धान्यापासून करतात. चवीला इंजिरा आंबुस-गोड लागतो कारण तेफचं पीठ आंबवलेलं असतं. आणि म्हणूनच तो जाळीदारहि असतो. इथिओपियन इंजिरा अत्यंत चवदार लागतो.

त्याच्याचबरोबर "दोरो वत्" म्हणजे कोंबडीचा रस्सा आला. आपण खातो तितकाच मसाला इथिओपियन लोक खातात. कोंबडी अतिशय स्वस्त असते. आणि "डोरो वत्" हा एक अत्यंत थोर अन्न-प्रकार आहे. नंतर भाजलेलं कोकरूं — कोबीच्या पानांत लपेटून टेबलावर ठेवलेलं. जेवण रंगांत आलं आणि एकदम एक रंगीत पदार्थ



अनुक्रमणिका

वाढणींत नव्यानेंच दाखल झाला : कच्च्या मांसाचे तुकडे (तेंहि गोमांस हो, गोमांस !). इथिओपियन माणसांचा अत्यंत आवडीचा पदार्थ, त्याला मीठ-मिरची लावून एकाग्रपणें सर्वजण तें खात होते. त्यांच्या दातादातावर आनंद चकाकत होता. सरतेशेवटीं कच्चा खिमा वाढणीस आला. माझ्या इथिओपियन शेजाऱ्यांनीं आग्रह कर करून मला तो घ्यायला लावला. माझ्या चेहऱ्यावर अचानक उदात्त आणि गंभीर भाव पसरले. माझा जबडा संकोचला. मी पटकन् जळजळीत कटिकालाचा (एक कडक, पारदर्शक दारू, जी स्पिरिट लँपमध्यें उत्तम काम देते) छोटा ग्लास घशांत ओतला आणि कच्च्या खिम्याचा—एक घास राजाचा, एक शिक्षणखात्याचा, एक गव्हर्नरचा—असे भराभर घास घेतले. कच्चं मांस चावूनहि चावलं जात नाही हें ध्यानांत येतांच मी नव्यानें गवसलेलं तेज हें पेय ग्लासांतून घशांत ओतलं आणि हें मांस गिळून टाकलं.

परदेशी पाहुण्यानीं अद्याप ह्या गावांत असं केलं नसल्यामुळें माझी वाहवा झाली. क्षणार्धांत मी नेटिव झालों, तो पुढें कायमचाच !

(९)

तें वातावरणाचं अनोळखीपण होतं कीं माझंच अनोळखीपण होतं कोण जाणे. माझ्या सर्वांगाला धार चढली होती. मी पुस्तकं वाचली नाहींत, शब्द खरडले नाहींत. फक्त घडलों.

खरं शेवटीं एवढंच शिल्लक राहतं ? ह्या लिहिण्याचा तरी काय उपयोग ? लिहितां लिहितां माझी भाषा तुमची व्हायला लागते आणि सांगणं सुरू होतं. जिथं तुम्ही दाद देतां तिथेच मी शरमिंदा आणि अपराधी झालेला असतो. एकेक शिकलेला शब्द मी आरशासारखा वापरतोय् पण त्यांत स्वतःला बघायची मला इच्छा नाही. हे सगळे शब्द तुमच्या भाषेतले आहेत. त्यांतले संस्कार हजारों वर्षांचे आहेत. आणि मी शब्दानें शब्द नष्ट करून फक्त मधली वाहती प्रक्रिया होऊं पाहतोय्. मी खोटं बोलतोय्. कारण मी बोलतोय्.

नाही.

असं झालं तरी तें फक्त उच्चारांच्या दरम्यान कुंठित, मद्द, मुर्दाड अवस्थेंत होतं. जेव्हां मी भुकेला, मोकळा, सडा, धारदार, सळसळता, कडकडून कोसळता असतो तेव्हां माझा, तुझा, सर्वांचाच उच्चार गालीब असतो.

पण इथें 'मी' हा शब्द पुन्हा पुन्हा येतोय्. इथें अडतंय्. अत्यंत जिवंत असण्याचं फक्त वर्णन होतंय्. अजून खोलवर सुरा फिरवून एकेक दिवस अलगद कापून काढायला हवा.

(१०)

जागा, भोंवताल, आणि अस्तित्वबद्दल. अनोळखी जागेंत त्याच त्या दोघांची तीच ती शरीरंसुद्धां अनोळखी आणि जिवंत होतात. कौमार्य, पुन्हां नव्या कौमार्याची आपोआप होणारी उपज, अलंघ्य उंबरठे.

विषुववृत्तीय रात्रीच्या दाट, भोर आकाशांत लखलखणारे तारे. युकॅलिप्टसच्या झाडांतून वाहणारा सळसळ वारा. पांचसुरी गाण्याची एक लकेर.

"मस्करम् महिन्यांतलं फूल..."

मस्करम् दूर आहे. थंडीचे दिवस. कधीं संध्याकाळ स्पष्ट असते. कधीं अतिशय दाट धुकं पडतं. दुपारीं सावलींत थंडी वाजते. जन्मभर इथें राहावं. मला स्वतःचा देश नाही, घर नाही, लोक नाहींत. आहे त्यांतच मी नाहीसा झालोय्. कापूर. माझा कापरांतला वनवास; अज्ञातवास.

(११)

ठाकूर म्हणाला, इथिओपियन स्त्री समागमांत पुरुषाचं पुरुषत्व पिसाट हालचालींत नाहीसं—गहाळ करून टाकते. Twisting, twisting, wriggling time out.

मी काहीच म्हणालों नाही.

प्रेम सहज होतं, मुलानें मुलीला किंवा मुलीने मुलाला म्हणायचं, 'तर मग ?' आणि जास्त बोलावं लागायचं नाही.

जॉन म्हणाला, फार दूर जायला नको, जवळांत जवळ जें झुडुप दिसेल त्यांत दोघं गुडुप.
मी कांहींच म्हणालों नाहीं.
ठाकूर म्हणाला, हे लोक नीतिमुक्त आहेत.

असतील, मी म्हणालों, असूं देत.
जॉन म्हणाला, साली दहा-बारा वर्षांची पोरं-पोरी हिंदुस्थानां-तल्या आई-बाबांना लाज आणतील.

मी म्हणालो, हिंदुस्थानांतले आई-बाबा लाजेकाजेस्तव आई-बाबा झालेत.

मल्य म्हणाला, शिल्पांतल्या त्या मिथुनांचं काय ?
मी म्हणालों, तेवढंच हिंदुस्थानांत जिवंत आहे.
मल्य म्हणाला, तूं शाक्त आहेस.
आहे, मी म्हणालों, असेन किंवा नसेन, मी कसलीच पूजा करत नाही.

ठाकूर म्हणाला, यार पीते हो शराब और पानीपर नाझ करते हो !
मी गटागटा व्हिस्की प्यालो, म्हणालों, गप् भडव्यांनो, तुमची भंकस बंद करा. Let's not talk sense, for a change.

मल्य म्हणाला, तेहेतीस वर्षं मी कांहींच केलेलं नाहीं, आत्तासुद्धां कांहींच करत नाहीं, पुढेंसुद्धां कांहींच करणार नाही. आजन्म ब्रह्मचारी राहून अश्लील पुस्तकं वाचणार आणि प्रवास करणार.



" आजच मालक व मालकीण तुमच्याकडे रहावयास गले आहेत. "

ठाकूर म्हणाला, अरे तूं एवढा देखणा, उंच, तरुण. अजून तूं एकहि बाई चाखलेली नाहीं ?

मल्य म्हणाला, छे: छे: आणि बाईला approach तरी कसं व्हायचं.

ठाकूर म्हणाला, तूं बाईकडे न लाजतां बघ, बाई येईलच येईल.
मल्य म्हणाला, छा : छा :, नॉन्सेन्स्. . .

मी म्हणालं, मल्य, ह्या देशांत तुझंहि कौमार्य भ्रष्ट होणार, पण तें कायमचं गमावूं नको.

ठाकूर म्हणाला, रोज रोज गमाव.

मी म्हणालों, कमावलेलं ब्रह्मचर्य.

ठाकूर म्हणाला, तेहेतीस वर्षांची धरणं, तटबंद्या.
जॉन म्हणाला, in the nearest bush....

तर्र् पिवळा प्रकाश. मी माझा कंदिल उचलला आणि म्हणालो, गुडनाईट.

(१२)

अरबांची आणि सोमाल्यांची दुकानं. मातीची घरं. सेडार आणि युकॅलिप्टस. शाळेचे कांपाऊंड. काँक्रीटच्या आधुनिक इमारती. पलि-कडचा नाला, त्या पलिकडे डोंगर.

गाव, तज बेत, वार, वेश्यांची घरे, श्रीमंत इथिओपियन्स् – त्यांच्या पाठोपाठ छत्री आणि बॅग घेऊन जाणारे त्यांचे नोकर. घोड्यांवरून बाजाराला येणारे गाल्ला. त्यांच्या बुजऱ्या बायकांचे तारांसारखे घट्ट बांधलेले केस, कपाळाला घातलेला मण्यांच्या माळेचा वेढा, काळेभोर भिरभिरे डोळे, बाजाराला येणाऱ्या कोंबड्या, अंडीं, गुरं-ढोरं, खेचरं घोडे, धान्यधुन्य, मसाले, भाज्या. बाजाराच्या रस्त्यावरला रंगीबेरंगी कचरा.

पोस्ट ऑफिस. त्यांतलं पत्रांचं मेज आणि उघड्या पोस्ट-बॉक्सेस्. रोजची पोस्टांतली फेरी. ब्रिटिश वृत्तपत्रें, अमेरिकन साप्ताहिकं, घरोघरचीं पत्रं, वातम्या. असेल्ला हॉटेलच्या बारमध्यें मेलोत्ती बिअर पीत फोडून अधाशीपणें वाचलेलीं पत्रं.

स्वीडीश् हॉस्पिटल्. डॉक्टर निल्ट्रम आणि त्याची देवभोळी बायको. डॉक्टरची इथिओपियांतली चाळीस वर्षं. ऑर्गन्. जोहान् सेबॅस्टियन् बाख्. शिकारीच्या रायफली. लायब्ररी, हिप्पोपोटॅमसचं कातडं. फुलबाग, डॉक्टरच्या व्हरांड्यांतून दिसणारीं झ्वाई सरोवरांतली बेटं. अँथ्रपॉलजी. वैद्यकी. बायबल. दंतकथा आणि आठवणी. सहा फूट उंच, धिप्पाड, गोबऱ्या गालांचा, टकल्या, बारीक निळ्या डोळ्यांचा डॉक्टर. त्याचं नऊ हजार फुटांवरलं पारदर्शक





हास्य. सकाळचा चहा. स्वीडीश् बिस्किटं, खुर्च्यांवरल्या रंगीबेरंगी छत्र्या. गवतांतले पक्षी. पलिकडे.

डॉक्टरने दोन गोष्टीच सांगितल्या. इथिओपियन स्वभाव कसा गुंतागुंतीचा, चक्रम, विनोदी, अडाणी, धूर्त, भावनाप्रधान, निब्बर, हळवा, सरळ, न समजणारा आहे इ. इ. पण डॉक्टर मिस्किलपणे हसत होता.

इतालियन आक्रमणाच्या वेळची एक तुफान विनोदी गोष्ट. एकदां दोन इथिओपियन गनिमांना एक न फुटलेला बॉम् सांपडला. ही वस्तू काय आहे याचा अचंबा वाटल्यानें त्यांनी तो आपल्या लष्करी तळांत आणून सेनाधिपति रास ×××× च्या स्वाधीन केला. रास ×× ×× ला ह्या अजब वस्तू विषयीं कुतूहल वाटून त्यानें आपल्या ताब्यांतील इतालियन सैनिकांना बोलावून त्याबद्दल माहिती विचारली कीं ही संशयास्पद वस्तू काय आहे. इतालियन सैनिक म्हणाले, हा बॉम् आहे.

रास ×××× नें विचारलें कीं ह्याचा उपयोग काय ?

इतालियन युद्धकैदी म्हणाले कीं हा स्फोटक असून तो शत्रूवर टाकल्यास शत्रू गारद होऊन खेरीज जमिनीस मोठा खड्डा पडत असतो. परंतु हा न फुटलेला बॉम् गैरमाहितगार लोकांच्या हातीं राहिल्यास तो केव्हांहि फुटून त्यामुळें मनुष्यहानी होण्याचा संभव आहे, तरी याची तडक योग्य ती विल्हेवाट लावावी.

तेव्हां रास ×××× याने डोळे बारीक करून व शिवाय कपाळास सूक्ष्म आठचा घालून धूर्तपणें असा निर्णय घेतला कीं जर ही बॉम् नांवाची वस्तू म्हणजे इतर कांहीं नसून स्फोटक दारू भरलेला गोळा आहे, तर तो जवळ ठेवण्यांत नक्कीच धोका आहे. परंतु त्याची विल्हेवाट कशी लावावी ? जर या इतालियन युद्धकैद्यांचे हातीं हा दिला तर ते याचा आपल्या विरुद्ध उपयोग करण्यास क्षणमात्र कचरणार नाहीत, यास्तव आता ह्यांजकडून हा बॉम् न फुटूं देतां नष्ट करण्याचा उपाय जाणून घ्यावा व आपल्या सैनिकांसच तें काम सोपवावें. असा विचार झाल्यावर त्यानें आपले डोळे अधिक बारीक करून व कपाळास अधिक सूक्ष्म आठचा घालून शक्य तितक्या धूर्त आवाजांत त्या इतालियनांस प्रश्न केला कीं ह्याची विल्हेवाट कशी लावावी. ते इतालियन म्हणाले कीं हा बॉम् अत्यंत काळजीपूर्वक मैल दोन मैलांवर नेऊन तेथे तीन हात खोल खड्डा खणून त्यांत पुरून त्यावर माती लोटावी, म्हणजे त्यापासून धोका राहणार नाही. विचारांती रास ×××× यास ही गोष्ट पटून त्यानें आपल्या चार विश्वासू सैनिकांवर हें काम सोपवलें.

हे चार सैनिक सबॉम् कामगिरीवर निघाले. साधारण तीन मैल अंतर चालून गेल्यावर त्यांजला एक बॉम् पुरण्यास योग्य असें स्थळ आढळलें व पुष्कळ विचारांतीं त्यांनी ह्याच स्थळीं खड्डा खणण्याचें मुक्रर करून तात्काळ तसें करण्यास प्रारंभहि केला. परंतु साधारण तीन बोटें खोल खड्डा खणल्यानंतर त्यांच्यापैकीं जो एक अधिक आळशी व तितकाच हुशार होता त्यानें अशी शक्कल सुचविली कीं ह्या वस्तूचा नाशच जर करावयाचा आहे, तर ती जाळून कां न टाकावी ? रास ×××× हे इतालियन युद्धकैद्यांवर विश्वास टाकून आपणांस उगाचच हे काम सांगून मोकळे झाले आहेत. पण तीन हात खड्डा खणण्यांत वेळ दवडण्यापेक्षां आपण थोड्या काटक्या गोळा करून व शेकोटी पेटवून ही वस्तू येथेंच जाळावी, व ती जळून जाईपर्यंत मनोरंजनास्तव गाणीं वगैरे म्हणावी, हेंच संयुक्तिक होय. हा विचार सर्वांस तडक पटून त्यांनी शेकोटी रचली, तिच्यावर बिस्तव टाकला, व गाणीं म्हणू लागले. भोंवतालचे कांहीं शेतकरी व गुराखी सुद्धां ही मौज बघण्यास जमले. परंतु बॉम् ढिम्म् तो ढिम्म्. तो जळेच ना. अखेर वैतागून एका सैनिकानें जाळांत तो बॉम् ढोसण्यास सुरुवात केली. आता बॉम्चा सोशिकपणाहि संपुष्टांत आला व झाला एवढा ताप पुरे झाला असें वाटून तो ढुम्म् धडाम् इत्यादि बॉम् जातीस सहज असे ध्वनि करून स्फोट पावला. ह्या स्फोटामुळें भोवतालची सर्व मंडळी ठार किंवा जखमी झाली. (ही फार वर्षांपूर्वीची गोष्ट असल्यामुळें कोण कोण मरण पावले हें निश्चित सांगतां येत नाहीं. नसो.)

इकडे स्फोटाचा आवाज कानावर पडून रास ×××× नें लढाईची जय्यत तयारी करविली व शत्रुसैन्याच्या हालचाली व स्फोटाचें उगमस्थान पाहून येण्यास आपले कांहीं गनीम धाडले. शत्रू न दिसून, व एकूण गोष्ट कळून हे गनीम परतले. तेव्हां रास ×××× नें त्या सल्लागार इतालियनांस मौतेची सजा फर्माविली, कारण त्याच्या

मतें हें सर्व घडून येण्यास त्यांचा चुकीचा सल्लाच कारणीभूत होता. बॉम् सर्वांसमक्ष लष्करी तळांतच नष्ट करण्यास काय वरें हरकत होती ?

गोष्ट संपवून डॉक्टर म्हणाला, "कोण म्हणतो इथिओपियनांच्या विचारां-वागण्यांचा अर्थ सहज लावतां येईल ? चाळीस वर्षांत मला हें जमलेलें नाहीं. —— कदाचित् म्हणूनच असेल !"

[ १३ ]

प्रकाशाचे वर्ण. ऐन हिवाळ्यांत सकाळ व्हायची ती दह्यासारखी घट्ट, शुभ्र, थंड. जमिनीवर दाट धुकं लोळत असायचं. चिलालूच्या प्रकाश-शिखरांवर सूर्य आला कीं धुक्यांत ऊवदार गुलाबी सोनेरी पट्टे पसरत जात. मिन्टामिन्टाला देखावा सवर्ण बनत जाई. धुक्यानें घट्ट, अस्पष्ट, ढगाळ केलेल्या वस्तू भराभर वेगवेगळ्या होत. प्रकाशाच्या उठावांत लोळणारी धुकीं नाहीशीं होत. झाडू मारून लोटल्यासारखीं तीं सावलींत जात. झाडांचे बुंधे, दऱ्या, नाले—ह्यांतच तेवढं धुकं राह्यचं.

मी असा निळा रंग बघितलेला नाही. इतके भराभर पालटणारे निळे वर्ण इतरत्र आकाशांत क्वचित् दिसतील. चिनी मातीवर भट्टींत जशी झिलईदार चकाकी दिसते तशा चकाकीपासून ते थेट उदवत्तीच्या धुराच्या मंद आणि दाट वर्णांपर्यंत रंगाच्या दाटींत आणि तकाकींत लाखपण होतं. क्वचित् मोराचा निळा रंग रात्रीं आकाशांत दिसायचा. रात्र आणि संध्याकाळ यांच्या दरम्यानचा एखादा तास अक्षरशः क्षणाक्षणाला आकाशपालट होत. सूर्य झ्वाईच्या पलिकडे अस्त पावला कीं आकाशांत निळा, निळसर हिरवा, हिरवट पिवळा, लिंबासारखा फिका पिवळा, मोतिया, गुलाबी, नारिंगी सोनेरी असे एकेक वर्ण पसरतां पसरतां विसर पावत. मग निळ्याचा जांभळा, निळसर हिरव्याचा पारवा, हिरवट पिवळ्याचा फिका निळा – असे नकळत बदल होत. पश्चिमेला थेट थोडा रंगाचा शिडकाव ढगांवर ठरे. नंतर जांभळीभोर रात्र आणि उजळ चुन्याचे खच आकाशांत पडत.

दुपारीं मात्र आकाशाला खरी निळी आच असायची. त्या रंगानें डोळे दुखत. सगळ्याच वस्तूंवर अति जांभळ्या प्रकाशाची सर्वांगीण फेक व्हायची.

निसर्गाला खरोखर कलर ट्रान्सपरन्सींतले झळझळते रंग यायचे.

हिवाळ्यांतहि उन्हं अंगाला भाजत आणि सावलींत स्वेटर-शिवाय थंडी वाजे.

दुपारच्या सुट्टींत शाळेसमोरच्या गवती मैदानांत मुलं लोळत पडत. जीन्स् आणि जॅकेट्स् घालून गवतभर लोळत पडलेल्या ह्या मुलांना प्रचंड आळस आलेला असायचा. सकाळीं सव्वाआठापासून दुपारीं साडेबारापर्यंत अभ्यास केल्यावर मवली सुट्टी व्हायची. ती अडीचपर्यंत. अडीचनंतर मुलं परत येत तेव्हां कांहीं जणं पोटभर तल्ला पिऊन तुडुंब सुस्तींत असायची. तल्ला ही इथिओपियनांची घरगुती बिअर. ती पिणाराला आळसाचें खरें महत्व कळतें.

संध्याकाळीं पांचाला शाळा सुटून मोकळी झालेली मुलं व्हॉलिबॉल आणि फूटबॉल खेळत. फूटबॉल इथिओपियांतला सर्वांत लोकप्रिय खेळ.

इथिओपियांतल्या विरळ, डोंगराळ हवेंत लोक लवकर दमतात. लोक म्हणजे अर्थात् बाहेरचे. इथिओपियन माणसाला जबरदस्त दमसास असते. रोमच्या ऑलिंपिक खेळांत मॅराथॉन जिंकणारा आव्वब बिकिला कसा धांवतो याची मला कल्पना आहे. आठ नऊ हजार फुटांवर अशा वेगांत धांवायचा ज्याला सराव आहे तो समुद्र-सपाटीवर तर दमणं अशक्यच.

ग्रीकांनीं ह्या लोकांना Aethiops म्हटलं —— म्हणजे भाजून ठिक्कर पडलेल्या चेहऱ्याचे लोक. उन्हाचा राप खरा चढतो गोऱ्या वर्णाच्या लोकांवर. फिक्या वर्णाचे स्लाव्ह आणि स्कँडिनेव्हियन लोक इथि-ओपियांत आल्यावर एकदम भूमध्य सामुद्रिक ताम्रवर्णाचे होतात. इतालियन लोक जास्तच काळसर लाल दिसतात.

इथल्या हवेंत उल्हास आणि सुस्ती दोन्ही आहेत. एक तर सततचे चढउतार दमसास वाढवतात – खरे हे डोंगरांतले आरोह अवरोहच. आणि उन्हाचा आणि थंडीचा जबरदस्त कडाका शरीराला अधिकच बदल सोसण्याची ताकद देतो. पण हेंहि बाहेरच्या माणसांनाच लागू पडेल. इथिओपियन परदेशांत चटकन् मिसळू शकत नाही. हिंदुस्थानांत येऊन गेलेल्या इथिओपियनांना इथला उन्हाळा भयंकर वाटतो. युरोपांत जाऊन आलेल्यांना तिथला निमूट प्रकाश मानवत नाही. असं तेच स्वतः म्हणतात. पण हेंहि खरं नसेलच. मुळांत इथिओपियन माणूस अत्यंत बंदिस्त स्वभावाचा आहे. शेकडों वर्षं डोंगरांच्या अलंघ्य भिंतीआड राहिल्यानें फरंजी माणसाचं मन, जगणं आणि जग यांच्या-बद्दल त्याला संशय आहे. आपल्याशीं जिवाभावाची मैत्री जमलेल्या इथिओपियन माणसालाहि अनेकदां हे डोंगर चढावे-उतरावे लाग-तात. आतां आतां हे कमी होतंय्. आणखी थोड्याच वर्षांत हे लोक जगांत मिसळून जातील.

फेब्रुवारींत छोटा पावसाळा येतो. दिवसांतून एकदोनदां उडत्या नाचऱ्या सरी येऊन जातात. एप्रिलपर्यंत अधूनमधून असं होतं.

ईस्टरपूर्वींचे तीन महिने लेंटचा उपास असतो. प्राणिज पदार्थ ख्रिश्चन लोक खात नाहींत. मात्र मासे खातात. मांस, कोंबड्या, अंडी, दूध, लोणी ह्या अगोदरच स्वस्त असलेल्या गोष्टी फारच स्वस्त होतात. नास्तिक आणि परदेशी लोकांची चंगळ असते. डॉलरला म्हणजे साधारण दोन रुपयांना साठ अंडीं–७५ सेंटस्ना कोंबडी. चार रुपयांना सबंध कोकरूं.

पण ईस्टर संपला कीं हें संपतं. इथिओपियन लोक आपल्याकडच्या धार्मिक लोकांप्रमाणेंच उपासाच्या काळांत फक्त भूक कमावत

अनुक्रमणिका

अन्नाचा विचार करत असतात. इतके दिवस कडक उपास पाळल्यावर तेज, तल्ला, कटिकाला, आराके यांसारख्या दारूच्या बाटल्या आणि तऱ्हेतऱ्हेचे गाईच्या, कोंवडीच्या, मेंढयांच्या, बकऱ्यांच्या मांसाचे प्रकार एकदम खायला सुरुवात होते. सणावाराच्या दिवशीं दारू पिऊन मारामाऱ्या लोक करणारच. भडकलेला इथिओपियन मित्राचाहि तडक खून करील. नंतर पश्चात्तापानें कधीं कधीं आत्म-हत्याहि करील.

एकूण लोक रंगेल.

शौक आणि ऐष प्रत्येकालाच करावासा वाटतो.

आणि मुख्य म्हणजे खाणं पिणं आणि लैंगिक जीवन ह्यांत ह्यांना धर्माला सहज हुलकावणी देतां येते. चर्चमध्यें लग्न केल्यास जन्मभर बायकोशीं एकनिष्ठ राहावं लागेल ह्या भीतीमधून ह्यांनी डमोझ् पद्धतीचं – म्हणजे पगारी – लग्न शोधून काढलंय्. बायको असेपर्यंत तिला मानधन द्यावं. तिला बडतर्फ केल्यावर दोघेहि मोकळे. मूल झाल्यास ते मोठं होईपर्यंत त्याला खर्च द्यावा.

एकाच बाईच्या सहा मुलांचे बाप वेगवेगळे असतात आणि कौतुकाची गोष्ट म्हणजे प्रत्येकजण आपल्या प्राणिशास्त्रसिद्ध बापाचंच नांव ठाऊक असल्यास उघड लावतो.

ह्या देशांत आडनांवाची कटकटसुद्धां नाहीं.

ह्याचा शिव्यांशी संबंध आहे. मुख्य लोकप्रिय शिवी म्हणजे "येत आब्बातू" म्हणजे "तुझा-किंवा ह्याचा – बाप कुठाय् ?" त्या खालो-खाल "मिन्ह आब्बातू ?" "ह्याचा (तुझा इत्यादि) बाप तरी कोण होता ?" त्यानंतर, "शर्मूता" म्हणजे "रांड"; "डश्शा" म्हणजे "कुत्तरडा" इ. इ. मी आईबहिणीवरून शिव्या ऐकल्या नाहींत. बापावर समाजांतला मान अवलंबून म्हणून त्याला शिवींत महत्व आलं; इतर भावंडांचा बाप कोण ह्याचं कोणाला फारसं वाटत नसावं. बहिणीचं बहिणीनं बघावं. उच्चवर्गीय अणि खरोखरीचे धर्मनिष्ठ लो : ह्यांच्यांतच कुटुंबसंस्था खऱ्या अर्थी आढळते.

ह्यामुळें इथिओपियन मुलं आपल्याला निराळीच वाटतात. प्रत्येकजण स्वतःच्या पायावर उभा राहायला धडपडतो. पण निकरावर येतांच तो नेहमीच सडा, फटिंग आणि स्वार्थी बनतो. मात्र कुटुंबाची जागा मित्र घेतात. मैत्री ह्या एका मूल्याला इथिओपियन लोक खूप महत्व देतात. मला जे थोडे इथिओपियन मित्र लाभले त्यांच्यांत ही एक गोष्ट उजळ होतीच.

खरं तर वरची सगळीच निरीक्षणं अर्धसत्यं असतील. झपाट्यानें बदलणाऱ्या समाजांत ह्या गोष्टींबद्दल लिहायला नुसती माहिती, निरीक्षणं, प्रतिभा पुरत नाहीं. थोड्या काळांत का होईना, एक इथिओपयन जन्म कंठावा लागेल अगोदर.

[क्रमशः]









# प्रभाकर श्रीधर नेरुरकर

आम्ही एकमेकाचे आहोत. आजही माझी काकी हयात आहे व ती आजच काय पण गालिबच्या भाषेत 'जियो हजारो साल' अशीच माझी तिच्यासाठी निरंतर प्रार्थना असते. अर्थातच त्याचा अर्थ असा की माझी काकी, म्हटलं तर आमची काकी, म्हटलं न म्हटलं तर आपणा सर्वांचीच काकी अमर होवो असेच आपणा सर्वांचें म्हणणे राहील. काकीनें अमर झालेच पाहिजे. किंबहुना जी अमर होणार नाही ती काकीच नव्हे. अमर म्हणजे केवळ न मरणे असा मात्र संकुचित अर्थ यांतून कुणी न काढावा म्हणजे झालें. अमर म्हणजे आठवणीने अमर असे सुद्धां होईल. आमच्या काकीचे असेंच कांहीसें झाले आहे. ती माझ्या काकांची बायको : (हें आतां काय सांगायलाच पाहिजे ?)

काकीची पहिली आठवण आता मला आठवते ती म्हणजे तेव्हांची कीं, जेव्हां मी काकीकडे नव्हतो व काकीच आमच्याकडे आली होती. आमच्याकडे म्हणजे आमच्या गांवाला. म्हणजे तिच्याच गांवाला. सासरला म्हणानात. मी तेव्हां असेन नसेन दहा वर्षांचा. नुक्ती कुठे कांहींतरी जगाची समज व उमज पडू लागली असावी. आमचं घर कसलं ते. परिस्थिति बेतावाताची. म्हणजे आपलं घर होतं एवढंच काय तें म्हणण्यासारखं आपलं होतं. बाकी घरांत तांदूळ दुकानांतूनच आणावे लागत. उकडे तांदूळ लोकांकडून मागून आणावे लागत.

**आमची** काकी म्हणजे खरं आमचीच काकी. पण ती तुमचीहि काकी कां असूं नये असाहि म्हटला तर प्रश्न विचारता येईल. येईल म्हणजे खासच येईल. यावा, कां न यावा ? काकी असावी हा मक्ता काय फक्त आम्हीच घेतला आहे ? काकी नाही म्हणजे एखाद्याच्या जीवनात काहीच नाही. एक वेळ काकी ही आईपेक्षाहि उजवी वाटते किंवा वाटावी असे प्रसंग ज्यांनी काकी आहे त्यांच्यावर वारंवार नसले तरी अनेकदा आलेले असतात. नसतात का ? विचारून तर पहा स्वतःला. अगदी पुनः पुनः विचारून पहा. म्हणजे हा प्रश्न त्यांनाच विचारता येईल कीं ज्यांना काकी आहे. किंवा ज्यांची काकी आहे. किंवा फार तर जे आपल्या काकीचे आहेत. मला हें सांगण्यास धन्यता वाटते कीं मला काकी आहे, नव्हे मीच काकीचा आहे म्हणजेच तात्पर्य मी व काकी



# आमच्या काकीची कहाणी

**आमचे काका होते लष्करी अधिकारी! गोरेपान धिप्पाड, झुपकेदार मिशावाले. दिसायचे फार रुबाबदार.**

**—पण काकी होती खऱ्या शिस्तीची. खरा रुबाब होता तिचा. तुम्हांलासुद्धां जाणवेल बघा !!**

घरांत पेज व्हायची. पण पेजेबरोबर भाजी असेलच असें नक्की नसायचें. पेज सुद्धा नक्की असेलच असे पण कधी नसायचे. घरांत दोन वेळ जेवायला मिळायचं हें खरं. पण तेवढंच. आमच्या कमरेत एक काळा दोरा आणि वीतभर लंगोटी आम्हाला खऱ्या अर्थानें नग्नता लाभू देत नसे. बाकी आम्ही घरी दारी काय, नागडे उघडेच वावरत असूं. घरात एक आजी आणि आई पण होती. वडील होते. भावंडें होतीं. कोंबडी कमी होती. मांजरे तर खूपच होती. अवाठांतील होती नव्हती ती मांजरें आमचं घर आपलंच समजून आंत बाहेर फिरतीवर रहात असत; ओसरीवर पडलेली असत; कधी देवघरांत चक्क देवाला पोटाखाली घेऊन झोपी जात असत. असं तें वयाचं दहावं वर्ष न आठवतांहि अजून आठवतं. म्हणूनच मग काकी पण आठवते. काका पण ! . . . . .

आमच्या काकांचं आपलं बरं होतं. म्हणजे बरंच बरं होतं.

त्यांचं आपल्या वडील भावासारखं नव्हतं. म्हणजे आमच्या वडीलासारखं ! आमचे वडील म्हणजे काय, बोलून चालून खेडवळच.

काकांचं तसं नव्हतं.

काका हपीसर होते. मिलिटरींत कीं काय होते. थंड हवेच्या शहरांत रहात असत. दिसायला गोरे पान. अगदी थेट साहेबासारखे दिसायचे. डोक्याला झक्क टक्कल. नाक डोळे ओठ तरतरीत. नेहमी सुटाबुटात. मात्र चिरूट ओढायचे. रुबाबदार इंग्रजी फाड फाड बोलायचे. इंग्रजी वर्तमानपत्रें वाचायचे. रात्री काचेच्या पात्रातून लाल लाल रंगाचं मादक पेय प्यायचे. खूप खूप असायचे. स्वतःवर नि भोवतालच्या जगावर...

असे माझे काका : तशीच माझी काकी :

त्या दिवशीं शाळेला महिन्याची सुट्टी झाली म्हणून आम्ही आनंदात होतो. घरीं आलो तर आजी म्हणाली,

'बाळानो, आज उद्या घराची पुरी साफसफाई करायला लागा. ओसऱ्या स्वच्छ करा. अंगण झाडा. चोफाळा स्वच्छ धुवा. कपडे नीट नेटके ठेवा. घरांतील भांडी, हंडे, टोप लख्ख घासा. घरांतल्या खुर्च्या (दोन मोडक्या तोडक्या) धडधाकट ठेवा. अभ्यासाची पुस्तके नीट लावा. कोंवडयांची निगा घ्या. आणि शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या मांजराना पिटाळून लावा... . '

त्यावर मी विचारलें आजीला,

'आजी. आज काय हें ?. . . आम्हाला सुट्टी झाली म्हणून का ?'

(तुम्हाला अगोदर सांगून ठेवले पाहिजे कीं माझे व माझ्या आजीचे कांहीं भल्याऐकीं बरें नव्हतें. तिचें म्हणणे असायचे (माझ्या वडीलांकडे) कीं मी तिला छळतो व मी (आईला) म्हणायचो कीं ती मला छळते... असो.)...

'नाही रे बाबा, नाही.'

'मग...'

'आज पत्र आलें आहे...'

'कुणाचें ?. . . '

(आम्हाला तशी फारशी पत्रें कुणाची येत नसत.)

'तुझे धाकटे काका व काकी उद्यां येणार आहेत गावाला'.

'असं काय ?'....

'होय. म्हणून आत्ता लगेच कामाला लागा. चला. केरसुण्या घ्या...' आजीचें म्हणजे तिने म्हटलें म्हणजे झालेंच पाहिजे.

आणि आम्ही कामाला लागलो. आम्ही म्हणजे मी आणि माझी भावंडें. सगळींच माझी भावंडें नव्हतीं. कांहीं गरीब आतेची मुले होती. आश्रयाला आलेली. थोडक्यांत मीच दादा होतो घरांत. दादा म्हणजे वयाने दादा. वर्तनाने नव्हे. तसा मी किंवा आम्ही सगळेच वावंळट लोक होतो. आजीबरोबर मी भांडण करायचो हें खरं: पण कसलं भांडण तें. तिने दोनदा दम भरला, आईने एकदा पेकाटात लाथ घातली नि वडिलांनीं श्रीमुखात ठेवून दिली कीं आमचं तोंड बंद व्हायचं. हालचाली बंद व्हायच्या. आणि मवाळपणे आम्ही आमची दैनंदिन जीवन राहणी तसेच पुढे चालू ठेवायचे. झोपायचे तेव्हां आम्ही सगळे एकत्र झोपत असू. खेळायचे तेव्हां आम्ही खळ्यांत सगळे एकत्र खेळत असूं. रडायचे सुद्धां आम्ही एकत्र. तसेच एकत्र हसायचे....

त्यामुळे आजीने आम्हाला काका काकी येणार ही वार्ता दिली आणि आम्ही आपले कामाला लागलो.

दुसऱ्या दिवशी आमच्या घराचा सगळा देखावा पार बदलला. तें लखलखीत दिसू लागलं. आईने, आजीने व आमच्या बहिणींनीं घरांतील जमिनी शेणाने सारवून गुळगुळीत केल्या. चूल घरांतील गेल्या कित्येक महिन्यांतील काजळी घासून घासून पुसून टाकण्यांत आली. आम्ही हातात काठ्या घेऊन वावरू लागलो. परकं मांजर दिसलं कीं त्याला हाणायचं, कोंबडं दिसलं कीं त्याला पिटाळायचं, कुत्रं दिसलं कीं किंचाळायचं असा आमचा दीर्घोद्योग सुरू झाला.

मग संध्याकाळीं आम्ही लख्ख पांढरे कपडे अंगावर चढवले. एकुलती एक अर्धचड्डी, पांढरा हातधुणीचा अंगरखा, गुळगुळीत डोके व त्यावरील शेंडी व शेंडीभोवती भोवरा असा आमचा सगळा प्रकार होता.

आजी, आई, वडील तिघेही म्हणाली आम्हाला,

'अरे, सगळे चव्हाटयावर जाऊन मोटारीची वाट पहात रहा.' वडील म्हणाले, "मी गडी घेऊन येतो." आजी म्हणाली,

वाटेत म्हाराटोराना शिवूं नका.' आई म्हणाली, "चन्हाटचावर कांहीं खेळू नका."

अशा रीतीने त्या दिवशी आम्हीं आमच्या गावाच्या चन्हाटचावर सर्व्हिस मोटारीतून खाली उतरतांना प्रथमच आमच्या काकीला व काकांना पाहिलं.

म्हणजे आतां चाळीशीच्या चुकीच्या बाजूला झुकलेला मी ते दृश्य आठवतो आहे.

तेव्हांची ती काकी तश्शीच आणि अगदी तश्शीच तीच ठासून लक्षांत राहिली आहे. म्हणजे ती स्त्री होती हे नक्कीच. जितके आमचे काका पुरुष होते तितकीच ती स्त्री होती. काका उंच, धिप्पाड, लष्करी पेहरावात होते. त्यांच्या ओठीं चिरुट जळत होता व पोटीं वीतभर रुंदीचा काळा कातडीचा पट्टा घट्ट आवळला गेला होता. त्यांचे कपडे काळे होते तर काकी निळ्या भडक रंगाची पातळ नेसली होती. पण काकी ठेंगू होती; म्हणजे तशी ठार ठेंगू नव्हती; पण फार ठेंगू होती एवढं खरं होतं. म्हणून प्रथम ती आम्हाला आमची काकी वाटली नव्हती. पण वडीलांनी जेव्हां मोटारीच्या टपावरील काकांचं सामान गड्याला त्याच्या डोक्यावर घ्यायला लावलं, तेव्हां तो पुढे चालूं लागला व वडील त्याच्या मागून चालू लागले, व वडीलांच्या मागून काका चालू लागले व जेव्हां काकांच्या मागून ती स्त्री चालू लागली तेव्हां ती काकीच आहे अशी एका क्षणांत आमची खात्री झाली. आमच्यापैकी परशा सर्वांच्या अगोदर धावत पळत घराकडे गेला व आपल्या किनरी कर्कश आवाजांत खळ्यात जाऊन ओरडला, "काका आले. काकांबरोबर काकी आली..." आणि मग सगळीजणं खळ्यांत आखाड्यावर उभी राहून काका-काकीची वाट पाहूं लागली.

आम्ही आपले गपचूप पावले टाकीत काकीच्याही खूप मागे राहून घरची वाट चालत होतो. संध्याकाळ होत होती.

तेव्हां रस्त्यावरच निरीक्षण करता करता आम्हाला आढळून आलं कीं काकी जितकी ठेंगू होती तितकीच ती लठ्ठ पण होती. आम्हाला त्याच सुमारास शाळेत कीं कुठे कुणीतरी गोष्ट सांगितली होती. ती ओठीं येऊ लागली आणि 'चल रे भोपळ्या टुणुक टुणुक' असे शब्द मूकपणे आमच्या तोंडातल्या तोंडात पुटपुटलें गेले. पण लगेच आम्ही सर्वांनी करकरून जिभा चावल्या व तोंड फिरवून फडाफड गालफडात मारून घेतल्या.

आमची नैतिकता त्यावेळी इतकी प्रबळ होती व घरचा व घरावाहेरचा धाकही जबरदस्त होता.

काका काकी नव्वद शंभर मैलांवरच्या शहरी जीवनांतून आलेली असल्यामुळे त्यांनी शहरी जीवनाचा घाट व थाट अर्थातच आपल्यावरोबर आणला होता. काकीच्या पायात नाजुक, सुंदर, पातळ, एक रंगी चप्पल होती. (काकीचे पाय सुंदर नव्हते ही गोष्ट वेगळी). काकी नेसली होती तसलं पातळ आमच्या खेडेगावांत वर्षानुवर्षं आम्ही पाहिलं नव्हतं. काका घरीं आल्यावर आमच्या मोडक्या खुर्चीवर पण रुबाबानें बसले तेव्हां दुसरी खुर्ची (मोडकीच) घेऊन काकी पण खुर्चीवरच वसली. (अर्थातच ती खुर्चीत गडप झाल्यासारखी वाटत होती.) पण आपल्या सासूबाईला तिने तसा म्हणण्यासारखा कांही वाकून नमस्कार केला नाही. आम्हा मुलाबाळांकडे कांही फारशा हौसेने व मायेने पाहिलें नाहीं. ती आपल्यातच आपली एकटीच पडल्यासारखी वाटत होती. माझी आई आपली दारातूनच तिच्याकडे पाहात होती व माझी गरीब विधवा आते आंतूनच वळईतल्या काळोखांत उभी राहून न पहाता बाहेरून जे ऐकू येईल ते ऐकत होती. वडील सामान सुमान नीट ठेवण्यांत गुंतले होते; काकांचा चिरुट जळत होता; म्हटलं तर आम्हीही जळत होतो.

असा प्रकार थोडा वेळ झाला.

नंतर थोडावेळ काहींच झालं नाहीं.

आम्हांला भीति वाटत होती आमच्या काकांची. त्यांची ती करडी नजर, झोंकदार मिशा, करारी कठोर बोलणे, जरव नि हुकमत. मिलिटरी बाणा. काकी बिचारी नेहमी त्यांच्या धाकांत रहात असावी अशी आमची कल्पना. आम्हालाही त्या क्षणापासून दडपल्यासारखं वाटायला लागलं होतं. उदाहरणार्थ, परशाची पहिली उसळी ओसरली होती; वामन्या सुरुवातीपासूनच 'नर्व्हस' झाला होता. मंगू काकांचा एकंदर रुबाब पाहूनच विरघळला होता. आजवर आमच्या श्रीमुखांतच वसत होती. पण आता आमच्यावर काठीहल्ला होण्याचा संभव होता; कदाचित आम्हाला बुटांच्या पायाखाली तुडवले जाणे पण अगदीच अशक्य नव्हते. त्या क्षणाला आमच्या ओटीवरची व घरादारांतील मांजरें सुद्धां नेहमीची 'म्याँव' 'म्याँव' टाकून कुठे गडप झाली होती.

इतक्यांत आमची काकी कुणी खुर्चीवरून एकदम लोटून द्यावं, तशी उठली. तिने आमच्या काकांकडे बघितलं. काकांनी तिच्याकडे वघताच मात्र मान टाकलेली असावी असं आम्हाला वाटलं. याच क्षणाला प्रथमच आम्हाला आमच्या काकीचा शब्द ऐकू आला. आवाज म्हटला तर किरकिरीत होता. म्हटला तर कर्कश होता. म्हटला तर काहींसा बायकी होता; नाहीतर बराचसा पुरुषी होता. (मोठेपणी जेव्हां आम्हाला नंतर He woman (तो स्त्री) व She man (ती पुरुष) कळलं तेव्हां मला काकी He woman असल्याचा बोध झाला; पण तें इथें अप्रस्तुत आहे.

"का हो. . .?" काकीने आरोळी ठोकली नाही एवढंच. 'किती वेळ इथं असं मला वसवून ठेवणार आहात ? ही माणसं पहा कशी माझ्याकडे टकामका बघताहेत. हे नुसतं घर आहे कीं प्रदर्शन घर आहे ? य पोरट्या...'





अनुक्रमणिका

तिने माझ्याकडे पाहूनच म्हटलं होतं. माझ्या ओठावर आलं होतं विचारायचं... 'काय काकी ?...'

'हटा सगळे : निघा इथून...'

आणि तेव्हां आमचे काका मोठ्या अजीजीने मध्ये पडले. म्हणाले, 'ए वये, अशी ओरडूं नकोस, आणि त्याला पोरटा म्हणू नकोस.'

'कां म्हणू नको ?" काकी.

'कां म्हणजे ? तो पोरटा नाही. तो तुझ्या थोरल्या दीराचा, माझ्या वडील भावाचा वडील मुलगा आहे. लाडोबाचा.."

"असेल, असेल. पण बघतो पहा कसा माझ्याकडे बोक्यासारखा..."

मी स्वतःला सावरलं नि मी बोक्या-सारखा खरोखरच आहे का तें मनाशी ठरवू लागलो.

मग आमची आजी पुढें आली...

"सूनबाई, अशा रागावू नका. सगळं कांहीं ठीक होणार आहे." नंतर ती आपल्या मिलीटरी मुलाकडे वळून म्हणाली, "गुंडोबा रे, तुम्ही आपलं दोघांच बिऱ्हाड पडवीच्या खोलीत थाटा.. सगळी खोली पोरांनी साफ-सूफ करून ठेवली आहे. चोफाळा आहे. खुर्ची आहे. टेबल आहे. सगळं आहे."

"आरसा आहे ?..." काकी एकदम ओरडूनच म्हणाली... (नंतर आम्हाला हळुहळु कळलें कीं आमच्या काकीला फक्त ओरडतां तरी येते किंवा रडता तरी येते... तो कथाभाग पुढे केव्हातरी..)

"आरसा ?" आजी धक्का लागावा तशी किंचाळली.

"आरसा ?" माझी आई आंतून तोंड झाकून बोलली..

"आरसा ?..." सारी पोरं प्रश्नार्थक मुद्रेनें एकमेकाकडे पाहू लागली. घरांत एक आरसा होता हें खरं. पण तो आरशाच्या पेटूलाला अडकला होता व तो कित्येक वर्षं वापरून वापरून गुळगुळीत झाला होता. त्याचा पारा निघाला होता व क्वचित कोना-कोपऱ्यांत स्वतःचं प्रतिबिंब त्यात उमटलेलं पाहून केस विंचरण्याची व कुंकू लावण्याची क्रिया सर्वांकडून पार पाडली जाई. कुणी त्याला घरात आरसा म्हणत नसत. 'भिंग' हा शब्द त्याच्यासाठीं घरांत रूढ झाला होता. व प्रचारात होता.

"आरसाच." काकी आतां उभी होती. "हो हो आरसाच. तुम्हा गांवढळांना काय ठाऊक असणार म्हणा आरसा."

"घरांत आमचं एक भिंग आहे." आजी घाबरत म्हणाली...

"भिंग ?"... भिरभिरत काकी किंचा-ळली.

तेव्हां काका मवाळपणे म्हणू लागले, "अग् ए, भिंग म्हणजे सुद्धा आरसाच..."

"तर मग तो भिंग की बिंग काय ते घेऊन या..."

काकानी लगेच सर्वांत मलाच निवडला. ते म्हणाले मला,

"खंड्या, घरांतून भिंग घेऊन ये..."

"हो काका, आत्ता आणतो..."

मी घरांत रिघलो तेव्हां अगोदरच आईनें आरशाचे पेटूल आपल्या हातात घेऊन ठेवले होते. ते तिने माझ्यापुढे केले. मी ते घेऊन बाहेर आलो... ती पेटी मी प्रथम काकांकडे दिली. काकांनी ती काकी कडे



## पहाटेच्या वेळीं

**पहाटेच्या वेळीं**
**परसांतल्या केळी**
**नभाची आसवं**
**चुखतात कां?**

**धुक्याची शाल**
**पांघरून टेकडी**
**वाटेंत वाकडी**
**लोळते कां?**

**नक्षत्रं खुडली**
**सागरीं बुडली**
**कुठचे हो तारु**
**अन्**
**कुठची हो वाट?**

**—उमाकांत ठोमरे**

दिली. ती पेटी तिला देतांना काकांचा हात थरथर कापत असावा असा आम्हाला भास होत होता. ते घाबरलेले पण दिसत होते.

(नंतर मग आम्हाला फार उशीराने वोध झाला. म्हणजे बऱ्याच कालावधीनंतरः काकी ही काकांची तिसरी पत्नी होती. त्यांच्यापेक्षां वयाने बरीच लहान होती व अशी बायको नवऱ्याला नेहमीच आपल्या मुठीत ठेवते; नवऱ्याच्या हातात काठी असली तरी... वगैरे)

"हें घे भिंग." काका पण कोंकणात आपण आलो आहोत हे स्मरून कोंकणी पद्धतीने बोलले.

काकी प्रथमच कोंकणात येत होती. ती अर्ध घाटावरची व अर्ध कोंकणातील होती.

"हें भिंग ?... कुठे आहे काच ?... कुठे आहे आरसा ?... ही पेटी आहे. ही लाकडी पेटी आहे. ही घेऊन मी काय करूं ?.."

तसा मी झटकन् पुढें झालो व पेटूळ उघडून आरशाचा भाग काकीच्या समोर ठेवला. आतां ती थंड होईल अशी आमची अटकळ.

पण........

रामा, शिवा, गोविंदा : काकीने आपलेच रूप त्या भिंगांतून पाहिलें कीं न पाहिलें कुणास ठाऊक : ती संतप्त होऊन सर्वांच्या अंगावर सारखीच ओरडली. "ह्या आरशांत काय कपाळ पाहू ?.. कीं माझं कपाळ फुटलेलं पाहूं. कीं कपाळावर हा आरसा फोडून फुटलेले कपाळ फुटलेल्या आरशात पाहू..."

तसं म्हटलं तर संध्याकाळ केव्हाच उलटली होती.

दिवेलागण होत होती :

आणि आमच्या घरात आमची काकी आग ओकीत होती. हा नमुना मला नवीन होता. आम्हा पोराटोराना नवीन होता. हा प्रकारच कांहीं अजब होता. आम्ही आशेने व धीराने काकांकडे पाहिले. पण काकांचा फक्त मिलीटरी वेष तरतरीत दिसत होता. पण सारा आवेश केव्हांच गळला होता....

आजी घरात गेली नि दिवे लावू लागली.

आई पण तेच करूं लागली.

आम्ही मुले पण कोंबड्या कुत्र्यांमागून गेलो.

सगळ्यांचा नूर उतरला होता.

काका पुरवले पण काकी नको असे सर्वांना झाले होते.

पण आता काकी घरांत आली होती व घरातच राहणार होती. आता काही इलाज नव्हता. आमचे वडील आपले अदबीनें सारे कांही कोपऱ्यांत उभे राहून पहात होते. आपण खेडवळ आहोत व ही आलेली माणसे आपल्यापेक्षा शिकलेली व श्रेष्ठ आहेत असा भास त्यांच्या चर्येवर उमटला होता. एरवी माझ्या आईला किंवा आम्हाला आपल्या आक्रस्ताळी वाणीने फाडफाड खाणारी आजी, आमच्या काकीपुढे निमूट होती. पुरती पड खाऊन होती. उगीचच घरात जाऊन धडपडत होती.

सगळं सामसूम झालं होतं पुन्हां.

काकी पण अंतर्मुख झाली असावी. बहिर्मुख होण्यासाठीं हवा असलेला आरसा देखील तिला मिळाला नव्हता.

"चला, कपडे काढा, हातपाय धुवा. तोंड धुवून घ्या..." काकांनी शांतताभंग केला. अर्थात् हें सारं काकीला उद्देशूनच.

काळोखात काकी गप्पच !

"उद्यां मोठ्ठा आरसा आणूया..."

तरीहि काकी गप्पच...

"आता रात्र झाली...उठा...हे माझ्या भावाचं घर आहे. हें माझंच घर आहे. अग हे तुझं सुद्धा घर आहे. हें आपणा सर्वांचं घर आहे. इथे कुणी कुणालाच मिलीटरीचे नियम लावायचे नाहीत..उठा...चला...कपडे बदला.."

काका वरेचसे अजीजीने व गयावया करून बोलत होते..

'म्हणजे मी मिलीटरीचे नियम लावते ?' काळोखांतून काकी किंकाळली, आणि पेटूल खाली जमिनीवर आपटून फुटल्याचा खळ-कन् आवाज झाला.

'मला या घरांत रहायचें नाही...' इति काकी.

'मी अशीच 'अवाऊट टर्न' करून माघारी जाणार...'

'तुम्ही कपडे काढूं नका. तुम्ही पण 'अवाऊट टर्न' करा...'

'मी म्हणते आहे. पण तुम्ही अजून ऐकतच नाही... चला म्हणते ना ?'

काकांनी आपली काठी जोरात कशावर तरी आपटल्याचा आवाज. पण तोंडातून 'ब्र' नाहीं....

'आत्ता काय होणार कुणाला ठाऊक ?' माझं काळीज धडधडूं लागलं. पण कांहीं होणार नव्हतं हेंही खरं होतं. कारण तत्क्षणीच काकी पुनः थपकन मारून खाली वसली. मला ती काळोखात काळी काळी दिसली. इतक्या वर्षांत काळोखात पहाण्याचा सराव मला झालाच होता. आणि मग आमची काकी ओरडायची थांबली आणि सरळ रडूं लागली. मुसमुसून रडूं लागली; काळो-खांत कुणींतरी घुसळण धरल्यासारखं आपलं मला वाटू लागलं. मला आपलं वाटू लागलं कीं असं कांहीं आपल्या घरांत पूर्वी कधी घडलं नव्हतं आणि आता कां घडतं आहे ? अजून घरात चूल पेटली नव्हती ? काकी आल्यापासून कुणाशीच कशी ती बोलली नव्हती. काकांनी काकीला आणली होती कीं काकीने काकांना धरून दाव्याला

अनुक्रमणिका

व धल्यासारखे आणले होते, याचा आम्हाला कांहींच बोध होईना.. घरांत मोठं विचित्र वातावरण निर्माण झालं. मी म्हटलं, माझे वडील तरी भडकून उठतील. आजी बाहेर येईल नि काकीला ओरडेल. काकांबद्दल आता आम्हाला कांहींच वाटेनासं झालं हं'तं. त्यांचं पाणी आम्ही ओळखलं होतं. मात्र काकीचं पाणी ओळखूनही ओळखता येत नव्हतं. ही तऱ्हा काही वेगळीच होती. अशी तऱ्हा जगात असते का असंच आम्हाला विशेषतः मला...राहून राहून वाटत होतं...

"पा ऽ णी..."

इतक्यांत काळोखातून साद आली...

'पाऽणी. मला कुणीतरी पाणी द्या...'

तसे काका झटकन् पुढे झाले व त्यांनी मी धावत जाऊन घरांतून आणलेला पाण्याचा तांब्या काकीच्या पुढे ठेवला...

"तुमच्या हातचे पाणी मला नको आहे."

"तें माझ्या हातचें नव्हें...." काका...

"पण त्याला तुम्ही हात सुद्धां लावूं नका" काकी...

"नाही लावत..." काकांनी उसनं अवसान आणल्यासारखं वाटलं.

आणि तितक्यांत आकाशवाणी व्हावी तशी पुनः काकी बोलली. (नि तें ऐकून मी भेदरून पण भुरकटून गेलो)...

"खंड्या... तूं कुठे आहेस ?..."

"मी हा इथे आहे, काकी..."

"काकी ?..." तूं मला काकी म्हणून हाक मारलीस ?...'

'होय, काकी ?..."

"तूं तुझ्या काकांना आल्यापासून हांक मारलीस का रे ?...'

"नाही काकी...""

"तुला मीच आवडले ना रे तुझ्या काकापेक्षा...?"

"होय काकी..." मी काळोखांतून काकांकडे पाहिलं. पडवीत टिमटिमणाऱ्या डबड्यातील प्रकाश किंचित् त्यांच्या मुखावर उजळला होता. पण त्यांचं तोंड काजळलं होतं... मला खरंच काकांची भीति वाटेनाशी झाली होती. खरे काका आता मी आमच्या काकीलाच मानू लागलो होतो. माझ्या मनांत काकीला 'काका' म्हणून जोरात हाक मारावी असे जोरदार विचार उफाळत होते. काकीला मी केवळ एकदाच एकच हाक मारून जिंकले होतें. जिथे काका पूर्ण हरले होते तिथे मी जिंकलो होतो. काकी जिंकली होती व मी जिंकलो होतो.

"काकी.." मी काकीच्या अगदी जवळ जाऊन तिला हाक मारली...

आणि काय सांगू ?... माझ्या आईने कधीं मला इतक्या मायेने जवळ घेतले नसेल इतक्या घाईने काकीने मला आपल्या जवळ ओढले. तिने माझ्या पाठीवरून हात फिरविला.. व पुनः तिला रडू अनावर झाले...

"तूं मला काकी म्हटलेस ?..." पुनः तिचा प्रश्न :

"हो काकी."

"मला अजून कुणी काकी म्हटलेच नव्हते रे..."

"हो का, काकी."

"तूं चांगला मुलगा आहेस खंडू...!"

"हो ना, काकी !..."

"होयच..."

"पण मला सगळी वाईट म्हणतात..."

"कोण म्हणतात ?... कांहो. कळलं का? आतां चला कपडे काढा. खोलीत चला. खंडू तूं पण चल. मी खंडूसाठी आता इथे राहणार. खंडू राहू ना ?..."

"तेच तर काकी मी तुला म्हणणार होतो?" मला एवढा मोठा कंठ कसा व केव्हां फुटला हेंच मला कळेनासे झाले होते. मी कधी इतका आईशी बोललो नव्हतो. कधी वडीलांशी तर नाहीच. कुणाशीच नाही. मला काकीनें बोलायला शिकवलं. काकीने आता या घरातच राहिले पाहिजे असा माझा ठाम विचार झाला. म्हणून मी काकीला म्हटले...

"काकी..."

"काय बाळ खंडू..."

"तूं आता या घरातच या गावातच रहा.."

"नाही रे बाबा.."

"का, पण काकी ?.."

"अरे या गावात तुम्हा लोकाकडे एक धड आरसा नाही..."

"पण मी तुला आणून देईन.. बाजारातून मला फक्त तू पैसे दे...



मास्तर—

(एक महान शोकांतिका)
एक होता मास्तर
त्याच्या कोटाला नव्हतें अस्तर

—ह. शि. खरात.

"या गावात तोंडाला लावायची पावडर मिळते का रे ?..."

"पावडर... म्हणजे काय काकी ?..."

"कप्पाळ. ते तुला ठाऊक नाहीं...."

"या गावात बायका पायात बूट घालतात का रे ?"

"बूट ?... पायात पुरुष देखील इथे बूट घालीत नाहीत..."

"संध्याकाळी आमच्या मिलीटरीतील बायका जातात तशा त्या फिरायला जातात का रे ?"

"काकी.. काकी... हें तूं काय विचारते आहेस ?..." मी एव्हांना खूपच धीट बनलो होतो. बोलका पण. जिभेवर सरस्वती बसल्यासारखे शब्द आपोआप उमटत होते व कुणाची व कसलीच मला पर्वा वाटत नव्हती. माझे वडील खेडवळ होते तर काका बावळट होते. माझी काकी हीच सर्वांत चांगली होती. सर्वांना पुरून उरणारी होती. माझा बावळटपणा कुठे पळून गेला. मी मग मलाच वेगळा दिसू लागलो.

"चला, जेवायला चला..." काकांची ऑर्डर झाली.

"खंड्या, तुझ्या काकीला उठवून न्हाणीघरांत ने..." आजी...

"अहो वन्स, आता असं कितीवेळ इथेच बसून राहणार. उठा ना ?... चला.







अनुक्रमणिका

हातपाय धुवा. कपडे बदला." आई...

पोरं टोरं सगळी चिडीचूप होती. दूर कुठेंतरी एकटंच एक मांजर ओरडत होतं. कुत्रे भुंकत होते. काळोखात रॉकेलचा दिवा पिटपिटत होता. मी माझ्या काकीला बिलगलो होतो व ती मला आंजारीत होती. गोंजारीत होती. ती उठली. तसा मी उठलो. मग ती मला प्रेमळ स्वरांत म्हणाली..

"खंडू..."

"काय काकी..."

"तूं माझ्यावरोबर येशील ?..."

"कुठें काकी ?"

"आमच्या शहरांत..."

"हो, काकी..."

तशी काकी उठली. अंगणांत गेली. तिने तोंड धुतलं. व मला म्हणाली,

"खंडोवा..."

"काय काकी..."

"सकाळी उठल्यावर पहिली गोष्ट..."

"कोणती काकी ?"

"आरसा..."

"हं.. काकी."

"फणी..."

"हो, काकी..."

"पावडर..."

"हो हो हो..."

"आणि मग तूच मला सांगायचं..."

"काय तें, काकी ?..."

"मी कशी दिसते..."

"अगदी जरुर, काकी..."

"मी कशी वसते..."

"ठीक, काकी..."

"मी कशी हसते..."

"नक्कीच, काकी..."

"मी कशी रुसते..."

"म्हणजे काकी ?..."

"तें तुला हळुहळू कळेल, खंडू..."

अशी ही माझी काकी, मला पहिल्याच दिवशी पहिल्याच क्षणात वश व्हावी हें कोडं मी अजूनही उलगडू शकलो नाही. काकी मग जेवल्यावर हळूच मला म्हणते.. "खंड्या, तुझ्या कांकाचा रुबाब फक्त वरवरचा समजलं."

"हो समजलं, काकी..." मी कळवळून म्हटलं. व पुढें म्हटलं.

"काकी, तुझाच रुबाब खरोखरचा. काकी, तूच खरी म्हणजे काका व्हायला हवी होतीस. नव्हे तूच माझी खरी काकी आहेस... काकी...काका...मी तुला काका म्हणू, काकी ?"

तशी काकीने माझा कान जोरांत पिरगळला व मला कुशीत घेत ती म्हणाली..

"तू अगदीं लवाड आहेस, खंडोवा... बरोवर ओळखतोस..."

आणि मी माझ्या काकीला माझी आई समजून आणखीच घट्ट बिलगलो व अधिकच आईचा नव्हतो इतका काकीचा झालो व काकी काकांची नव्हती इतकी माझी काकी झाली. ती काकी माझी झाली तशीच ती आम्हां सर्वांची झाली. ती खरं म्हणजे आमची म्हणजे तुम्हा आम्हा सर्वांची काकी झाली. नंतर मीच काकीकडे गेलो व नंतर काकीकडे राहीलो तो कथाभाग पुढें केव्हां तरी तुम्ही माझ्याकडून ऐकालच. नाहीतर मी तुम्हाला ऐकवीनच. पण तूर्तचा भाग असा कीं मी रात्रभर सकाळी कुठून व कसला आरसा मिळवून आणायचा याचाच विचार करीत राहीलो. व माझ्या स्वप्नांत सारखा एक आरसा येऊं लागला व त्या आरशात वसून काकीची कितीतरी विचित्र काळीबिद्री रुपे मला सारखी दिसू लागली...

सकाळी उठल्यावर काकी मला म्हणते.

"किती जोरजोराने ओरडत होतास तूं झोपेत, खंडू..."

मी हळूच म्हटलें....

"काकी, मी ओरडत नव्हतो. जोरजोरांत रडत असेन...."

"असशील. असशील..."

काकी मला म्हणाली व आपले तोंड वळवून पुनः घो.रू लागली.

अशी आमची काकी. माझी काकी. तुमची (?) काकी. ही केवळ तिच्या पहिल्या भेटीचीच पहिलीच पहांटे उठून लिहिलेली (अ) पूर्व कथा. समजलं ?

●●●

# साभार पोंच

**व्यंकटेश माडगूळकर यांची कथा**
संपा. अरविंद गोखले,
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २
मूल्य ५ रु.

**शापथ**
लेखक : अरविंद गोखले.
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २
मूल्य ४ रु.

**मराठी कथा १९६३**
संयोजक : अरविंद गोखले
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २
मूल्य ३ रु. ५० पै.

**समीक्षा : मराठी नाटक आणि मराठी रंगभूमि**
लेखक : वा. ल. कुलकर्णी, के. नारायण काळे, ज्ञानेश्वर नाडकर्णी, मंगेश पाडगांवकर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४
मूल्य ३ रु. ५० पै.

**वात्रटिका**
लेखक : मंगेश पाडगांवकर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४
मूल्य ३ रु.

**रानझरा**
लेखिका : दुर्गा भागवत
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४
मूल्य २ रु.

**रंजना प्रकाशन, मुंबई ११**

**जाग** (कथासंग्रह)
लेखक : कै. शांताराम पाटील
मूल्य ४ रु.

**केवड्याचें कणीस**
लेखक : अण्णाभाऊ साठे
मूल्य ३ रु.

**मोह**
लेखक : चंद्रकांत काकोडकर
मूल्य ५ रु.

**सुप्रिया**
लेखक : चंद्रकांत काकोडकर
मूल्य ४ रु. ५० पै.

**मदनिका**
लेखक : चंद्रकांत काकोडकर
मूल्य ३ रु.














अनुक्रमणिका



**ती भलतीच 'सामाजिक' झाली. बिचाऱ्या नवऱ्याला तिचा 'वैयक्तिक' सहवास मिळेनासा झाला—**
**पण एक दिवस——**

—प्रतिभा सबनीस




**माझी** बायको फार सुंदर आहे. खरंच, अगदी असामान्य लावण्यवती आहे. आणि आमच्या लग्नाला आज चार वर्षं होऊन गेली तरी तिचं तें वेड लावणारं सौंदर्य अजून कायम आहे. माझं मलाच कधीं कधीं आश्चर्य वाटतं कीं, इतकी सुंदर बायको आपल्याला मिळाली कशी? तसा मीहि कांहीं दिसायला वाईट नाही. शिवाय पुरुषाचं सौंदर्य ज्या गोष्टीवरून तोलतात ती भव्य शरीरयष्टि, रुंद खांदे, भरदार छाती, काळ्या केसांची दाट झुलपं हें सारंहि माझ्याजवळ आहे. आणि भरीला आहे अफाट संपत्ति!

वडिलांनी त्यांच्यामागे आम्हा दोघां भावांत त्यांची वरीच मोठी इस्टेट वांटून दिली. वडील गेले त्यावेळीं माझा मोठा भाऊ रजनीकांत युरोपांत होता. तो थोड्या दिवसांसाठीं इकडे आला. मात्र जातांना आपला तिकडेच लग्न करून स्थायिक होण्याचा बेत त्यानें जाहीर केला. आणि स्वतःच्या नांवाचा हिस्सा त्यानें बक्षिसपत्र करून मलाच देऊन टाकला. थोड्याच दिवसांनी त्याचें मार्थाशी लग्न झालें आणि नंतर आठ पंधरा दिवसांनी येणाऱ्या त्याच्या पत्रांतून मार्थाच्या रुपवर्णनाखेरीज आणि शेवटी "हेम्या, आतां तूंहि लग्न करून टाक बेट्या" अशा सल्ल्याखेरीज कांहींच मजकूर मिळेनासा झाला. मार्थाच्या रुपाचीं वर्णनें वाचून मीहि निश्चय केला कीं, तिच्यापेक्षांहि सुंदर बायको पटकावीन तरच नांवाचा हेमकांत!

अनुराधाला पहिल्या फटक्यांतच पसंत करून मी तिचा फोटो जेव्हां रजनीकांतला पाठविला तेव्हां त्याचें आणि मार्थाचें अभिनंदनपर पत्र आलें. आणि त्यांत त्यानें 'वहिनी' मार्थापेक्षांहि सुंदर असल्याची कबुली दिली होती. मोठ्या खटपटीनें रजा काढून तो आणि मार्था माझ्या लग्नसमारंभाला आली. भारतीय पोषाखांत वावरणारी मार्था पाहून अनु तर आश्चर्यानें चकितच झाली—ती तिची आणि मार्थाची पहिली ओळख. तिथून पुढें सुरू झाला पत्रव्यवहार! आणि त्यानें माझी पत्नी पुरी बदलली. एक नवं वारं तिच्या अंगांत शिरलं. आणि माझी पत्नी सामाजिक बनली.

"मी नोकरी करणार आहे." अनुच्या या पहिल्याच हल्ल्यानें मी हादरलो. "नोकरी? तुला काय गरज आहे नोकरीची? मला चांगला चार आंकडी पगार आहे. तुला हवे तेवढे आणि हवे तेव्हां पैसे देतोय् मी खर्चायला, म्हणशील तेव्हा डझनवारी साड्या मिळतात, दिमतीला आलिशान गाडी आहे. आणि हा बंदा तर सतत सेवेला हजर आहे! अशा स्थितींत राणीसरकारांसारख्या नाजुक फुलावर नोकरीची पाळी कां वरं यावी?" मी नाटकी आविर्भावांत विचारले.

"चेष्टा नको हं! मी खरंच नोकरी करणार आहे. या एक तारखेपासून कामावर रुजूं होणार आहे मी! हें बघ अपॉइन्टमेन्ट लेटर!" अनुराधानें पर्समधून पत्र काढून माझ्यासमोर धरलें. गव्हर्नमेंट ऑफीसचा तो शिक्का आणि तो रद्दी पिवळसर कागद पाहून

मी तर गारच पडलो "तूं, आणि गव्हर्नमेंट ऑफीसमध्ये नोकरी करणार? छान! लोक शेण घालतील माझ्या तोंडांत! म्हणतील नवऱ्याला हजाराच्या वर पगार तरी बायको नोकरी करते, आणि तीहि कुठें तर गव्हर्नमेंट ऑफिसांत....." "म्हणू देत! लोकांना काय जातं बोलायला? घरांत बसून माझा जीव उबून गेलाय् अगदी! तुला काय त्याचं?" मला पुरतं बोलूं न देतांच अनूनें सरबत्ती सुरूं केली. "अग पण कोण सांगतय् तुला घरांत बसून रहा म्हणून? आणि सांगून तूं ऐकतेसच जशी! तूं तर क्लबांत जातेस, मैत्रिणींकडे जातेस, सिनेमा पाटर्यांना जातेस; जीव उबायला काय झालय्?" मी विचारलें. "तूं आतां कांहीं बोलूं नकोस जास्त! अरे, तें सगळं केलं तरी तें तेवढ्या-पुरतं असतं! ऑफिसमुळें किती ओळखी वाढतात, चार तऱ्हेच्या लोकांत मिसळतां येतं, तुला एक नाहीं कुणाच्यांत मिसळायची आवड, पण मला कां म्हणून शिक्षा? म्हणे पार्टी! तेच तेच लोक येतात पार्टीला! त्यांच्या त्याच त्याच गप्पा! जरा वेगळं जीवन जगूं देत कीं मला! मार्था बघ कशी! नोकरी करून रजनी-कांतांच्या बरोबरीनें पैसा आणते घरांत!" अस्स! हें खूळ तिथून सुरूं झालं होतं तर! माझ्या डोक्यांत प्रकाश पडला—म्हटलं, जाऊंदे! करूंदे चार दिवस नोकरी—समजेल आपोआप!!

अनु नोकरी करायला लागली आणि माझी तिची निवांत गांठ पडणें मुश्कील झालें. ती आणि मी सकाळीं बरोबरच बाहेर पडत असूं, तिला तिच्या ऑफिसजवळ सोडून मी गाडी घेऊन पुढें जात असे. पण संध्याकाळीं माझें येणें कधींच निश्चित नसल्यानें ती एकटीच बसनें घरीं येई. रात्रीं मी घरीं यावें, तर दिवसभरच्या श्रमानें हिचे डोळे अगदी पेंगुळलेले असायचे. अर्थात कांहीं बोलायची सोयच नसायची! गडी वाढायचा तें जेऊन मीहि झोपत असे. एक रविवार मिळे, तोहि लवकरच बंद झाला. कारण नंतर सुरूं झाल्या तिच्या ऑफिसच्या ट्रिप्स, पिकनिक आणि सिनेमा! दर रविवारीं अनुच्या ऑफिसमधल्या चार मैत्रिणी चार मित्र आणि अनुच्या मागें शेपटासारखा मी, अशी सर्व कंपनी सिनेमाला जावयाची! हा असा ग्रुपच तयार झाला होता. मी पहिल्यांदा विरोध दाखविला. पण त्याचा वार फुसका ठरला. कारण कांहीं बोललं तर मार्थाचं पत्र माझ्या तोंडावर मारून, अनु हुंदके देण्यास सुरवात करी, "कसलं मेलं आमचं जीवन! मार्था बघ—रजनीकांत सगळं ऐकतात तिचं!" बायको रडते? छे छे! हा रानटीपणा होता माझा! माझा सगळा विरोध तिच्या अश्रुच्या एका थेंबाबरोबर वाहून जायचा आणि तिच्यासाठीं वाटेल तें करायला माझी तयारी व्हायची! अनु जिंकायची ती इथेंच! आणि मला मात्र सुंदर, शिकलेल्या आणि लाडावलेल्या बायकोपुढें नवऱ्याची अवस्था कशी होते याचा अनुभव मिळायचा!

एकदा कबुल करून मी गेलों नाहीं सिनेमाला, तर केवढा गोंधळ घातला आमच्या बाईसाहेबांनी! रात्रीं ती घरीं आल्या-बरोबर तिचं लेक्चर सुरूं झालं. "कमाल आहे हेम तुझी! अगदी लाज आणतोस मला बघ! मी अगदी खात्री दिली होती सगळ्यांना तूं येणार म्हणून! तिकिटहि काढलं होतं तुझं, माहित आहे? कबुल तरी कशाला केलंस मग? मला किती चिडवलं सगळ्यांनी! तुला काय त्याचं म्हणा! बायकोच्या मनासारखं करशील तर झीजशील ना तूं! समाजांत मिसळायलाच नको तुला! सारखं ऑफिस आणि ऑफिस!! त्याच्या बाहेर जग आहे याची कल्पना आहे का तुला? जरा चार लोकांत हिंडलं, फिरलं तर काय होतं रे? तें नाहीं तुझं! अगदी एकलकोंडा आहेस तूं! रजनीकांत बघ! कसे सगळ्यांच्यांत हसून खेळून असतात. वाच-तोस ना मार्थाची पत्रं? किती मजा करतात ती दोघं आणि त्यांचे मित्र? नाहींतर तूं! तुला ना मार्थासारखीच बायको हवी होती! बाकी ती तरी काय सुधारणार तुला? जन्मापासूनचाच तुझा स्वभाव असा असेल त्याला कोण काय करणार?"

खरं होतं तें! आमचा रजनीकांत लहानपणापासून असाच होता, आणि माझाहि स्वभाव लहानपणापासून असाच होता. कुढा, अबोल, आणि लोकांपासून चार हात दूर रहाणारा! पटकन कुणाच्यांत मिसळणे मला जमलें नाहीं. जमतहि नाहीं, त्यांतून एखाद्या माणसाबद्दल माझा ग्रह वाईट झाला कीं तो कायमचाच वाईट होतो. अनुच्या ऑफिसांतील माणसें चांगली होती. पण ती तिच्यापुरती! दरवेळीं त्यांना ती बरोबर हवी होती. आणि तिला एकटीला बोलवणें रीतीला धरून होत नाहीं या जाणीवेनें त्यांनी मला बोलावलं होतं. कधीं तिच्या ऑफिसांत जाण्याची वेळ आली तर माझा उल्लेख 'मिस्टर अनुराधा' असा होत होता. "तुम्ही आलं पाहिजे. नाहींतर अनुराधा येणार नाहीं," असें आमंत्रण मला कुठेहि जाण्यापूर्वी दिलें जात होतें. हें अपमानाचं शल्य सारखं टोचत होतं. म्हणूनच ती लोकं मला आवडत नव्हती. अनुला जाण्यास माझी कुठलीच हरकत नव्हती. माझं म्हणणं इतकेंच होतं, कीं तिनें जियें तियें माझी वरात काढूं नये. 'नवरा तिथें बायको' हें गणित सम होतं. पण माझ्या बाबतींत मात्र 'बायको तिथें नवरा' असं विषम गणित सोडवायला लागत होतं.

तिच्या नातेवाईकांकडे असाच प्रकार व्हायचा! "अनुराधा, अगदी महाग झालीय हो आम्हाला," असं तिची काकी, मामी कुणीतरी म्हणायची! आणि पुढचे मला उद्देशून काढलेले "तुम्ही तरी येत चला हो आमच्याकडे, म्हणजे अनु येईल." हें उद्‌गार ऐकले कीं अंगाचा तिळपापड व्हायचा! म्हणजे यांना अनु येण्यास हवी होती म्हणून मी हवा होतो.

मित्रांची हीच तऱ्हा. कधीं एकटा गेलों कीं "काय बेटचा, वहिनी कुठें आहेत? त्यांच्याशिवाय शोभा नाहीं तुला, इ. इ. मुक्ताफळं ऐकायला मिळायची. कुठें पार्टीला गेलों तर अनु माझ्याजवळ फार थोडावेळ बसायची! आणि मग ती 'समाजांत मिसळायची आवड असल्यानें' सर्वांची व्हायची. पार्टीला आलेले सगळे लोक तिच्या मागें मागे करायचे. किती बायकांचे शिव्या-शाप तिनें घेतले असतील कोण जाणें! पण हा दोष अनुचा

नव्हता! दोष होता तिच्या असामान्य लावण्याचा आणि माझ्या मुखदुर्बळपणाचा! पण माझा नाईलाज व्हायचा! मला कुणाशी बोलायची विशेष आवड नसल्यानें मी ड्रींक घेत एका बाजूला बसून रहायचा! आणि बडबडी अनु साऱ्यांची मनं जिंकायची! समाजापासून मी जास्त जास्त दूर रहायला बघत होतो, आणि अनु जास्त जास्त सामाजिक बनत चालली होती. म्हणूनच माझ्यापासून दूर चालली होती.

एका दुपारीं मी सहज लोळत पडलो होतो, सुट्टी होती, जेवण जड झाले होते, कारण अनुनें त्यादिवशीं लाडालाडानें मला जेवायला आग्रह केला होता. जड झालेले डोळे मिटू पहात होते, इतक्यांत अनु आंतून कांहींतरी गुणगुणत बाहेर आली आणि माझ्याजवळ बसत म्हणाली, "हे काय? लोळतोस काय? तीनला निघायचय आपल्याला. आई, पपा आणि श्याम आपल्या गाडींतून येणार आहेत. मी आईला सांगितलंय तसं! विसरलास वाटतं, चल उठ रे!" असं म्हणून ती बळें बळें मला उठवूं लागली, पण माझे दोन्ही हात तिच्या गळयांत अडकवून तिला माझ्या जवळ ओढत मी तिला म्हणालो, "राधा, एक विचारूं? रागवायचं नाहीं! किती दिवस झाले आपण फक्त 'दोघंच' असें कुठेंच गेलों नाहीं. आठव ते दिवस की ज्या वेळेला आपल्यांत कुणी आलं, तर तुझ्या अन् माझ्या कपाळाला आंठी पडत होती. आणि डोळयांत नाराजी दिसत होती. किती सुखाचे होते ते दिवस! तूं आणि मी—मी आणि तूं दोघच! फक्त दोघच! पाखरांसारखे चिवचिवत होतो आपण एकमेकांजवळ! त्यांच्यासारखेच पंख फुटले होते आपल्याला भटकायला! मोकळया हवेवर! कधीं भर दुपारी, तर कधीं मस्त चांदण्या रात्रीं! कधी जुहूचा किनारा तर कधी मलबार हिल! तूं म्हणशील तिथें, मला लहर येईल तिथें! दूर दूर.....! आपल्या पलिकडे कुठलंसं एक जग आहे, त्यांत माणसं रहातात याची जाणीवच नव्हती आपल्याला! मला फक्त तूं माहित होतीस आणि तुला फक्त मी दिसत होतो! तूं आणि मी! दोघंच! फक्त दोघंच! आठवतात कां ते दिवस तुला? सांग आठवतात? सांग नां! आणि आता......?" मी फक्त निश्वास सोडला!

"किती वेडा आहेस रे तूं हेमू? अरे, तेव्हांची गोष्ट वेगळी होती. तेव्हां आपलं नुकतंच लग्न झालं होतं. ते दिवसच तसे होते. पण आतां काय ती नवलाई राहिली आहे का? पांच वर्षं व्हायला आली लग्नाला आपल्या! सारखं सारखं काय दोघांनीच फिरायचं आतां? जरा चार माणसांबरोबर आलास, त्यांच्यांत मिसळलास तर तुझं काय विघडणार आहे रे? एवढी ती सगळी आपल्याला बोलवतात तर तुला यावयाला नको! विचित्रच बावा तुझा स्वभाव! अशाने नां तूं आणखीनच अबोल बनशील! सारखं काय जिथें तिथें दोघांनीच जायचं? शी, मला नाहीं आवडत! मार्था आणि रजनीकांत बघ! दर सुट्टीला ते आणि त्यांचा ग्रुप कुठेतरी ट्रीप्स काढतात, मजा करतात. आम्ही मेलं एका सुट्टीचं कुठें जायचं ठरवलं तर म्हणें दोघंच जाऊं!" मार्था, मार्था, मार्था! वेड लागलंय तुला राधा! अग मार्था ज्या समाजांत रहाते तो समाज फार वेगळा आहे. तूं तुलना करूं नकोस त्याची इथल्या समाजाशी! फार वेगळे पाया आहेत त्या दोन समाजांचे! इथें तसं वागून चालणार नाहीं. एवढा मोकळेपणा, एवढा बडबडेपणा आणि एवढी सर्वांच्यांत मिसळून रहाण्याची आवड पाहिली तर गैरफायदा घेतील तुझा सारे गैरसमजुतीनें!" मी चिडून म्हणालो. "तुझी फिलॉसॉफी मला नको ऐकवूंस! चल उठ, आटप लवकर," असं म्हणून अनु तिथून उठली अनुच्या उद्गारानें मी चकित झालो. "अनु...." माझ्याच्यानें पुढें बोलवेना! मी उठलो आणि अनुच्या माहेरच्या नातेवाईकांबरोबर जुहूला जाण्यास तयार झालों.




माझ्या सगळया सुट्टया अशा सर्वांबरोबरच, सिनेमा, पार्ट्या, पिकनिक, फिरणें, यांतच जायला लागल्या. नोकरीमुळें महाग झालेली अनु, मला मिळणेंहि मुश्किल झाले. सुट्टीचा आराम बंद झाला. बायकोशी चार सुखदुःखाच्या गोष्टी बोलणें मला अशक्य होऊन बसले. कारण ट्रिपला गेल्यावर चार लोकांतून उठून आम्ही दोघंच कुठें दूर जाऊन बसणें बरे दिसत नव्हतें. आणि घरीं तिला वेळ नव्हता! मला फुरसत नव्हती! सुट्टया आल्या आणि गेल्या, आणि मी अनुच्या पाठीमागे धावत राहिलो. पुढें पुढें तर मी कोणाच्यांत मिसळत नाहीं, आणि ती मिसळली तर नाराजी दाखवतो हे अनुच्या लक्षांत येतांच ती ट्रिपला वगैरे गेल्यावर माझ्याशी बोलेनाशीच झाली, एकटीच सर्वांच्यांत भाग घेई. गाणी म्हणें, धावे, खेळे आणि सगळयांतच पुढाकार घेई! अशावेळीं मी एकटा एका बाजूला बसून राही. आणि आमच्या स्वभावांतील हा विरोध पाहून सर्वजण "बिचारी अनुराधा" म्हणून चुकचुकत!






असं कांहीं झालं, कीं मला वाटे, अनुचा राग यावा अगदी खूप खूप राग यावा आणि तिला ताड ताड बोलून मोकळे व्हावे, आपण ! पण तो वंडखोर विचार मनांतल्या मनांत विरघळून जाई. माझा मुखदुर्बळपणा मला असा अडवायला लागला, आणि मी अनुचा राग त्या समाजावरच काढूं लागलो. ती माझ्या वाट्याला येत नाहीं, याची चीड मनांत वाळगून मी आणखीनच कुढा, अबोल वनत चाललो पण अनुला त्याची पर्वा नव्हती. ती जाणून वुजून माझ्याकडे दुर्लक्ष करीत होती, माझ्यापासून दूर चालली होती, म्हणूनच मीहि वैतागलो होतो, आणि चार दिवस कुठेंतरी दूर जावे, जियें मला शांतता मिळेल अशा ठिकाणीं जावे, असें माझ्या मनांत यावयाला लागलें.

तशी संधि मला चार दिवसांनीच आली. वडिलांनी ठेवलेल्या इस्टेटीतील १५–२० एकर जमीन आमच्या गांवीं पडून होती, ती विकून टाकावी असें माझ्या मनांत वरेच दिवस होतें, तसे मी आमच्या गांवच्या माणसांजवळ बोलूनहि ठेवले होते. तिला गिन्हाईक आल्याचें पत्र येतांच, त्यासंबंधी बोलणें करण्यास मला जाणें भाग होतें. १५।२० दिवसांची रजा काढून मी निघालो. अनुनें माझ्यावरोवर यावे असे मला फार वाटत होते, पण तसे वागायला ती मोकळी थोडीच होती ? एक तर तिला रजा मिळणें मुश्कील होते, आणि दुसरे म्हणजे तिला एवढ्या दूर खेडेगांवांत येणेंच पसंत नव्हतें. आणि तिथें जाऊन ती कुणाशी बोलणार होती? कारण 'मी आहे की बोलायला!' या माझ्या उत्तराला तिनें "तुझ्याशी, काय बोलायचं?" असा प्रतिसवालच टाकला होता. तेव्हा नाराज होऊन मी एकटाच निघून गेलो होतो.

माझं काम होण्यास ४।५ दिवस लागले. एक दिवस ज्यानें जमीन घेतली त्याच्याकडे जेवायला जावे लागलें, त्या रात्रीं घरीं आलों तर अनुराधाची तार पडली होती. 'असशील तसा निघून ये. मी वाट पहाते' मी घावरलो. आधीच तिच्यापासून इतके दूर रहाण्याच्या ह्या पहिल्याच प्रसंगानें मी वेचैन झालो होतो. त्यांत तिची तार पहातांच तर मी एकदम गडवडून गेलो आणि मिळेल त्या पहिल्या गाडीनें मी घर गांठले.

मला पाहतांच अनुनें मला एकदम घट्ट मिठी मारली आणि "मला सोडून जाऊं नकोस" असं म्हणत ती हुंदके देऊन रडूं लागली.

"वेडी की काय तूं ? काय झालं सांग, काय झालं ?" असं मी विचारतोय तर उत्तर नाहीं. तिचे आपले हुंदके चालूंच ! कांहींतरी विपरीत घडले होते खास ! गडी माणसांच्या देखत कांहीं व्हायला नको. म्हणून मी तिला वेडरूममध्यें घेऊन गेलो आणि तिला पलंगावर वसवून मी तिच्या शेजारी वसलो आणि तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागलो. पांच, सात, मिनिटं स्तब्ध-तेंत गेली. मी परत अनुला विचारलं, "काय झालं राधा? मला सांग ना ! काय झालं ! तार कां केलीस अशी ?" हेम........असं म्हणून ती परत स्फूंदू लागली आणि मग हुंदके देत देत तिनें सांगितलेली हकिकत अशी होती —

मी गेलो ते अनुच्या ऑफिसांत त्याच दिवशी कळले होते आणि माझ्या सर्व मित्रांना दोन दिवसांतच टाऊक झाले होते. कारण मी गेल्याच्या दुसऱ्याच दिवशीं माझ्या एका मित्राला वरची जागा मिळाली होती. त्या निमित्तानें त्यानें पार्टी दिली होती. अर्थात मी नसलो तरी अनुला जाणें भाग होते. आणि तशी ती गेल्यामुळेंच सारा घोटाळा झाला होता. पार्टीला आलेला प्रत्येकजण अनुच्या पुढें पुढें करीत होता. मग निघाली डान्सची शक्कल. आणि नाईलाज झालेली अनु कुणाची मनं दुखाऊं नयेत म्हणून प्रत्येकाबरोबर डान्स करूं लागली–त्यावेळीं सुधाकर जोशींनें तिला वाजवीपेक्षां जरा जास्तच जवळ ओढतांच अनु चमकली होती आणि पार्टी अर्ध्यावर सोडून डोके दुखण्याचे निमित्त सांगून गाडी घेऊन ती घरी आली होती. त्यानंतर सुधाकरनें रात्री दोनदा तीनदा तिला फोन करून कांही असभ्य गोष्टी विचारण्याचे धाडस केले होते. अनु अत्यंत घाबरली होती. त्यादिवशीं–

दुसऱ्या दिवशी रविवार होता. म्हणून अनू नहाली होती आणि केस वाळवीत गॅलरीत उभी होती–एवढ्यांत तिच्या ऑफिसांतील तिच्या अगदी नेहमीच्या ग्रुपमधील वसंत प्रधान आला होता आणि त्यानें तिच्या मोकळ्या केसावरून "सुंदर, फारच सुंदर दिसतां तुम्ही !" असें म्हणत हात फिरवला होता. अनुनें त्याला घरांतून जवळ जवळ हाकलूनच दिले होते.

त्यानंतर सुरूं झाली होती फोनची सरबत्ती––"हॅलो अनुराधा, काय करतेस ? एकटी आहेस नां ? माझं जरा खाजगी काम होतं तुझ्याकडे, येऊं कां दुपारी ?" असा अरुण कुलकर्णीचा फोन आला होता..........."वहिनी काल अगदी मस्त दिसत होता हं तुम्ही ! हेम्या बेटा भाग्यवान आहे. पण बुद्दू आहे साला ! मला तुमच्यासारखी बायको मिळाली असती ना तर......" ही मुक्ताफळं होती माझ्या मावसभावाची ! "हॅलो भाभीजी, मैं अुपेन बोल रहा हूं ! आप अकेली क्या कर रही है ? मेट्रोमें पिक्चर को जायेंगे हम !.....नहीं नहीं वह तो मैके गयी है। इसलिये तो पूछता हूं। हेमकांतसाबभी घरमें नहीं................." अनुनें फोन बंद केला होता.–आणि सगळ्यांत कमाल केली होती तिच्या मामेभावानें ! रात्रीं तो आला म्हणून हिनें साध्या मनानें त्याला जेवायला थांबवलें, तर बेट्यानें झोपण्याची तयारी दाखविली आणि आमच्या बेडरूमपर्यंत मजल मारली होती. अनु एकदम जागी झाली होती. आणि तिनें खाड्कन त्याच्या मुस्कटांत ठेऊन दिली होती–




एका दिवसांत एवढें नाटचमय प्रसंग नवरा बाहेर गेलेल्या स्त्रीच्या जीवनांत घडले होते. आणि समाजाचें अगदी व्यवस्थित दर्शन तिला झाले होते. समाजाच्या दोन्ही बाजू तिनें पाहिल्या होत्या. आणि आतां ती शहाणी बनली होती.

अनुचे हुंदके चालूच होते. पण त्या हुंदक्यांनीं मला बदलवले होते. इतके दिवस मुखदुर्बळ असलेला मी आतां तोंडाळ होणार होतो. आणि एकेकाला बरोबर दाखविणार होतो. अनुराधा माझी बायको आहे. ती माझी आहे. ती तुमच्यांत मिसळते, बोलते, बडबडते, मोकळेपणानें वागते, याचा असा गैरफायदा घेतां काय ? पण लेको, याद राखून असा ! अनु माझी आहे. आणि माझीच राहील––फक्त माझीच–माझ्या मनांतील विचार ओळखल्यासारखी अनु त्याच क्षणीं म्हणाली "मी फक्त तुझीच आहे रे ! फक्त तुझीच ! मी सर्वांशी चांगली वागते, मिळून मिसळून रहाते, पण माझ्या मनांत कधीसुद्धां पाप आलं नाहीं. तुझ्याशिवाय आणि कुणाचा विचारसुद्धा केला नाहीं मी ! मी फक्त एक चूक केली. समाज चांगलाच असतो असं मानलं. त्याची वाईट बाजू पाहिली नाहीं. तूं म्हणतोस तेच खरं ! मार्था रहाते तो समाज वेगळा आहे. आणि आपला समाज फार वेगळा आहे. दोघांची तुलना करणाऱ्यानें भारतीय संस्कृतीच्या दृष्टीकोनांतून ती तुलना केली पाहिजे. मी तिथेच चुकले. वेड्यासारखी मार्थाचें अनुकरण करायला गेले, आणि फसले. हेमू राजा, तुझ्या लाडक्या राधेला क्षमा"........तिचे पुढचे शब्द माझ्या ओठांवर पुसटले गेले ––

मला माझे पूर्वीचें जीवन परत मिळाले आहे. अनुनें नोकरी सोडली आहे, आम्ही अजूनहि पार्टीला जातो, पण आतां मी खूप बोलतो. खूप बडबडतो, अनुचें निम्मे काम मीच करतो. तीहि मला सोडून कुठें जात नाहीं. अजूनहि आम्ही सिनेमाला जातो. पिकनीकला जातो, ट्रिप्स काढतो. पण त्यांतील निम्म्या वेळां आम्ही दोघच जातो. फक्त दोघच.......छे चुकलं ! दोघं नाहीं हं ! तिघं जातो तिघं ! आतां येणारं तिसरं माणूस आमच्याबरोबर असतं.....पण तक्रार करून चालत नाहीं कारण जऽरा म्हटलं की "राधा, बाळाला तुझ्या माझ्या मध्यें नाहीं हं बसवायचं गाडीत, त्याला तुझ्या पलिकडे बसवित जा," तर डोळे मोठे मोठे करून ती माझ्याकडे बघते आणि म्हणते––"बाबा होणार आतां ! तरी तुझा फाजीलपणा जात नाहीं हं हेम अजून ! !" ......

●●●






अनुक्रमणिका




लेखक--चार्ल्स शॉ

अनु—प्र. श्री. नेरुरकर

**पूर्व कथासूत्र**

**त्या निर्जीव बेटावर हेन्री ॲलिसन हा नौदल सैनिक आणि सिस्टर ॲंजेला हीं दोन माणसें एकत्र येतात. पण विमानांची घरघर व त्यांनीं केलेली बाँबफेक यांच्या कोंडमाऱ्यांत ते सांपडतात. ॲलिसन धाडशी, कल्पक असतो. तो नव्या उमेदीनें आसरा शोधायला निघतो. ॲंजेला त्याला साथ देते. तो साहित्य गोळा करतो. कल्पकतेनें तें मांडतो आणि दोन 'निवासस्थानें' तयार होतात—**

**जोगिणीच्या श्रद्धेनें तिला 'क्रॉस' मिळतो.**

## [७]

## पुरुष--विचार

**दिवस** पळत होते. ज्या अवस्थेंत ती रहात होती तिच्या गरजेप्रमाणें त्यांच्या जीवनाला एक नित्य नियमित क्रम प्राप्त झाला होता. ती उद्योगमग्न असल्यामुळें वेळ भराभर जात होता. प्रत्येक दिवशीं आणि सदासर्वदा त्यांनीं समुद्रावर व आकाशावर पाळत ठेवली होती. लवकरच ॲलिसनला आढळून आलं कीं त्यांचं जाणं-येणं स्वाभाविकत:च एकाच त्याच रेषांवरून होत होतं. आणि त्याचा परिणाम म्हणजे जंगलांत तयार झालेल्या वाटा कीं ज्या शत्रू जिथें येईल तेव्हां त्याच्याकडून नंतर पाहिल्या जाण्याच्या संभव होता—याची त्याला भीति वाटली. म्हणून आपल्यापैकीं कुणीहि त्याच जागेवरून दोनदां यायचं किंवा जायचं नाहीं असा त्यानें नियम केला. तथापि, हा नियम पाळून सुद्धां त्या बेटावरील —आपल्या अस्तित्वाच्या खुणा निर्माण करण्याचं टाळणं त्यांना कठीण होत होतं.

एके दिवशीं, जेव्हां सिस्टर ॲंजेला टकडीवर पहारा करीत होती व तो त्या छोट्या नदींत स्वत: आंघोळ करीत बसला होता, तेव्हां त्याला आढळून आलं कीं नदीकांठानें आपण अगोदरच एक पायवाट तयार केली आहे. पाळत ठेवण्यासारखी ती एक दुसरी बाब होती. पुन: त्या जोगीणीजवळ आल्यावर तो म्हणाला, "सिस्टर, धुण्याबद्दल—नदीच्या उपयोगाबद्दल.....त्या तिथें खालीं कांहीं पाय खुणा मी तयार करीत आहे असं मी पाहिलं. तूं त्याबद्दल दक्षता घेशील ना, सिस्टर ?"

"हूं," ती उत्तरली. "मी त्याचा विचार केला नव्हता. मला समजतं. मी काळजी घेईन. मी आतां खालीं नदीवर जाणार आहे."

टेकडीवरून खालीं जातांना त्यानें तिला निरखून पाहिलं—जंगलच्या तकाकणाऱ्या हिरव्या रंगावर तिची धार्मिक अंगवस्त्रें अधिक काळी दिसत होती. तिच्याबद्दल कांहींसा चिंतामग्न होत तो झाडाला टेकला. झाडाझुडपांतून साप होते आणि रात्रीं त्यांनी मोठमोठ्या जनावरांच्या आरोळ्या ऐकल्या होत्या. त्या बेटावर खरोखरच कोणी प्राणघातक जनावरें असतील कीं काय याचं त्याला नवल वाटत होतं आणि स्वत:शींच तो म्हणाला कीं लवकरच जंगली जनावरांच्या अस्तित्वाच्या खुणांसाठीं नदी कांठावरील चिखल आपण शोधून पहायचा.

आता सिस्टर ॲंजेला त्या अरण्यांत अदृश्य झाली होती. आंघोळ करीत किंवा आपले कपडे धूत एखाद्या छान छपून राहिलेल्या नदीच्या पात्रांत ती खाली तिथें कुठेंतरी आहे असं त्याच्या मनांत आलं. त्या लांबट भरदार झग्याशिवाय ती कशी दिसत असेल ? या विचारानें तो हादरला. आपला चेहरा तापल्यासारखा त्याला वाटला आणि तो विचार मनांतून दूर सारण्याचा त्यानें प्रयत्न केला; परंतु कांहीं केल्या तो दूर होईना. कसं झालं तरी, ती कशी दिसत असेल, त्याच्या मनानं त्याला विचारलं. ती वयस्क नव्हती; कदाचित् त्याच्यापेक्षांहि ती तरुण असावी. तिची मुद्रा यौवनमय होती, आणि ती.....अच्छा, ती मुद्रा मनोहर होती. त्यासाठीं 'मनोहर' हा शब्द दुबळा आहे असं वाटून त्यानें आपले ओंठ ओलसर केले. त्यानें घरीं पाहिलेल्या—तसेंच चित्रपटांतील, कचेऱ्यांतील, भोजनमंडळींत आणि नृत्यप्रसंगीं पाहिलेल्या चेहऱ्यांची तिच्या चेहऱ्याशीं तुलना करून निर्णय घेण्याचा प्रयत्न केला. परंतु कांहीं केल्या त्यापैकीं कुणाशींच त्याची तुलना होईना.



अनुक्रमणिका

ते चेहरे नेहमीच्या जगांतील मुलींचे होते. त्या चेहऱ्यांची प्रत कशी लावायची हें त्याला ठाऊक होतं आणि त्या चेहऱ्यांसमवेत जाणाऱ्या देहांबद्दल तर्कवितर्क कोणते करायचे हें पण तो जाणत होता. परंतु नित्य दृष्टीला पडणाऱ्या मुलींच्या चेहऱ्याबरोबर तुम्हांला एका जोगीणीचा चेहरा निर्णयासाठीं घेतां येणार नाहीं. त्यांत अंतर होतं. त्यांत होती निश्चलता आणि ती विचित्र दूरगामी दृष्टी. अशा चेहऱ्यांत जीवंतपणा होता, आणि कधीं कधीं तो हंसला होता परंतु तुमच्यावर त्याची पडलेली दृष्टी ही वैयक्तिक नव्हती. तुम्ही जणूं कांहींच नाहीं अशी ती तुमच्याकडे पहात होती—कदाचित् तुम्ही पण आणखी एक जोगीणच आहांत असं सुचविणारी ! होय, तिच्याजवळ मनोहर मुद्रा होती—ठीक आहे-आणि ती संपूर्ण स्त्रीमुद्रा होती. परंतु कोणत्या तऱ्हेची मुद्रा—कोणत्या तऱ्हेची—?

ॲलिसननें स्वतःला ढवळलं आणि झाडांपासून तो दूर उभा राहिला. काय बरं, कशाबद्दल तो विचार करीत होता ? संतप्त आणि संत्रस्त होत पायाखालील एका दगडाला त्यानें ठोकर दिली. सिस्टर अँजेलाबद्दल विचार न करण्याची तो स्वतःवर सक्ती करूं लागला — फक्त त्यांच्या परिस्थितीचा विचार. काय करायचं, अन्नाचं काय, एखादा डुक्कर किंवा मासा पकडतां येईल काय, तो शिजवण्यासाठीं आग पेटती ठेवतां येईल काय, नाविकदल परत येईल काय— हे विचार तो स्वतःवर बळें बळें लादूं लागला.

परंतु त्याचं मन हें एक पुरुषी मन होतं. त्याच्या मनाला सिस्टर अँजेलाचा विचार करायचा होता. म्हणूनच मासे किंवा आग किंवा युद्ध यांचे विचार चालू असतांनाच मध्येंच तिचं शरीर, तिचं वय याबद्दलचे विचार क्षणभर त्याच्या मनांत उसळून येत होते, त्याचं लक्ष वेधून घेत होते, आणि निघून जात होते. तिनें परत यावं अशी इच्छा करीत तो शतपावली करूं लागला. त्याला वाटलं, कीं हळुवार स्वरांत त्याच्याशीं बोलणाऱ्या तिच्या सान्निध्यांत, ती एक संकटकालांतील सोबतीण व आदरणीय अशी पवित्र स्त्री आहे असेच विचार केवळ आपल्या मनांत येतील.

तिनें त्याच्यासाठीं प्रार्थना केली आहे, असा विचार त्याच्या मनांत आला आणि क्षणभर त्याच्या मनांतील आग त्या विचारानें थंड केली. परंतु आतां ती तिथें खालीं नदींत होती आणि ती चांगल्या बांधणीची होती काय? मग पुनः त्यानें ते पुरुषी विचार दूर सारण्याचा व अन्न व युद्धासंबंधींचे सैनिकी विचार मनांत आणण्याचा प्रयत्न केला. पण तो पूर्णपणें यशस्वी झाला नाहीं. ती वस्तुस्थिती तो उघड्या डोळ्यांनी पहात होता कीं त्याला व त्या जोगीणीला बहुधा प्रदीर्घ काळ तसेंच एकत्र रहावें लागणार होते. आणि हे चुकीचे, प्रबळ विचार नक्कीच परत त्याच्या मनांत येणार होते हें तो ओळखून चुकला होता.

मासे पकडण्याचे विचार सक्तीनें मनांत आणीत, दाणदाण पावलें टाकीत तो दूर गेला. परंतु इवलासा तो विकारांचा निखारा जळायचा थांबला नव्हता.

त्या दिवशीं संध्याकाळीं, ती त्याचं तोंड पाहूं शकत नव्हती, हें जाणून तो तिला म्हणाला, "सिस्टर, मला मोठं कुतूहल वाटतं आहे—प्रार्थना म्हणण्याबद्दल. मला म्हणायचं आहे तें असं. समज, आतां एका माणसाला स्वतःलाच आडकाठी करायची आहे-- अच्छा, त्यानें करूं नयेत अशीं कृत्यें करण्यापासून. त्याबद्दल तो प्रार्थना करूं शकेल आणि ती कृत्यें तो करणार नाहीं असं तुला वाटतं कां ?"

ऐहिक जगाचा अनुभव असलेल्या एखाद्या स्त्रिनें त्याच्या बोलण्याच्या सुरावरूनच त्याच्या बोलण्याचा अर्थ ताडला असता, परंतु सिस्टर अँजेलाला पुरुषांचं कांहींच ज्ञान नव्हतं.

"भविष्याची तूं उगीच भलती काळजी करूं नयेस." ती बोलूं लागली. "जेव्हां आम्ही--जर आपण इथून निसटलो तर—तूं काय करशील हें तुला कसं कळलं ? जें चुकीचं असेल असं तूं इथें काय करूं शकणार आहेस ? आमच्या खेरीज इथें कुणीच नाहीं."

त्याला म्हणायचं होतं, "तेंच तर मी म्हणतो. तेंच तर माझ्या मनांत आहे. फक्त आम्हींच, आणि तूं एक स्त्री. मी विचारग्रस्त, आणि तुझ्याखेरीज मला कुणी थोपविणारा नाहीं—आणि तूं एक स्त्री." परंतु त्याचा उच्चार त्याने केला नाहीं. कारण ते दोघे विचारांच्या भिन्न पातळीवर होते हें त्यानें ओळखलं; म्हणून तो म्हणाला, "होय. होय, मला तसंच वाटतं. आम्ही केव्हां निसटून जाऊं याचा विचार नव्हतो मी करीत. मी फक्त एवढाच विचार करीत होतो--अच्छा, मी प्रार्थना म्हणण्याबद्दल विचार करीत होतो. माणसाला तिची मदत होऊं शकेल काय ?"

"मला तिची मदत झाली आहे," ती म्हणाली, "वेळोवेळीं पुनः पुनः तिची मला मदत झाली आहे. अर्थातच तिची तुला मदत होईल. जर विश्वास ठेवला, तर तिची कुणालाहि मदत होईल. एवढं तूं जाणतोस असं मी समजत होते."

त्याला काय उत्तर द्यावं हेंच समजेना आणि तिनें विचारलं, "तुझ्या श्रद्धेचं स्वरूप कोणत आहे, मिस्टर ॲलिसन ?"

त्याला वाटलं, ती त्याला त्याचा परमेश्वरावर विश्वास आहे कां, असं विचारीत होती. आणि तिला कसं उत्तर द्यावं याबद्दल त्याला निश्चिती वाटत नव्हती. तो पोर होता तेव्हां त्यानें एक प्रकारच्या ईश्वरावर विश्वास ठेवला होता. तो तरुण होता तेव्हां त्यानें दुसऱ्या प्रकारच्या ईश्वरावर विश्वास ठेवला होता. अलिकडे या विषय संबंधीं त्यानें स्वतःची चांचणी घेतली नव्हती. "मी परमेश्वरावर विश्वास ठेवतो काय ?" आतां त्याने स्वतःला विचारलं आणि निर्णय घेतला कीं 'होय.'

"माझी श्रद्धा ?" त्याने उत्तर केले, "अच्छा, मला वाटतं परमेश्वर असावा. मला वाटतं तो कांहींसा सूर्यासारखा असावा किंवा अमेरिकेसारखा किंवा आपण जिवंत आहोत असं वाटण्यासारखा. आज सूर्य फारच कडक तापला आहे. एवढं बोलण्याखेरीज लोक सूर्याबद्दल अधिक बोलत नाहींत. लोक त्याचा



वाचनीय

एक होती मुलगी, तिचं नांव 'अनुमति'
प्रेक्षणीय नसेल पण–वाचनीय होती.
वर्तमानपत्राचं डिझाईन होतं तिच्या फ्रॉकवर
झाल्या गेल्या घडामोडी स्वच्छ दिसत अंकावर
एके दिवशी शेगडीमुळं फ्रॉकला लागली आग
डागळलें 'मुखपृष्ठ' करपला 'क्रीडाविभाग.'

—यशवंत देव

अधिक विचार करीत नाहींत. तीच गोष्ट अमेरिकेची. आपण तिच्याबद्दल बोलत नाहीं. ठीक, पण माणसाला ठाऊक असतं अमेरिका आहे. घरीं दारीं, जेव्हां शांत असतं सारं, आणि चांगला कामधंदा असतो तेव्हां मनुष्य आपल्या देशाचा फारसा विचार करीत नाहीं. परंतु युद्धांत मनुष्य त्याचा विचार करतो, जेव्हां एक बंदूक देऊन त्याला दूर कुठेंतरी पाठविण्यांत आलं आहे असं त्याला आढळतं, कारण जर त्याने व इतरांनीं कांहींतरी धडपड केली नाहीं तर कुणी परका देश अमेरिकेला दगा देण्याची योजना आंखीत आहे, असं त्याला आढळून येते--जर त्याला हिमप्रदेशांत रहावं लागलं किंवा जिथें फारसा सूर्यप्रकाश नाहीं अशा गांवांत रहावं लागलं तर मनुष्यप्राणी सूर्याचा विचार करूं लागेल, असा माझा तर्क आहे." तो थांबला आणि पाहूनही न पाहतांच तो दूर काळोखी अरण्यांत पाहूं लागला. "मला परमेश्वराबद्दल म्हणायचं आहे तें हेंच, मला वाटतं." तो बोलूं लागला. "माणूस परमेश्वराबद्दल बोलत नाहीं, परंतु तो परमेश्वराबद्दल सर्व कांहीं बरोबर जाणतो."

## [८]

### ते आले आहेत

**भग्न** स्वप्नांची स्मृति चाळवित दुसऱ्या दिवशीं सकाळीं अॅलिसन आपल्या खड्डयांत उठून बसला. सकाळची हवा गार व ताजी वाटत होती. अजून कुठें पावसाचं चिन्ह दिसत नव्हतं, हें त्यानें कृतज्ञतापूर्वक टिपलं. खड्डयांतून बाहेर पडल्यावर त्याला आढळलं कीं सूर्य जंगली झाडांचे शेंडे प्रकाशमान करीत होता. सिस्टर अँजेलाच्या खड्डयांतून आवाज येत नव्हता, म्हणून हळूवारपणें तो दूर चालत गेला व खालीं छोटया नदीकडे उतरला. तिथें त्यानें आपले कपडे उतरले व आंघोळ केली. त्या थंड पाण्यानें त्याची उध्वस्त स्वप्नांची स्मृति उधळून दिली.

जेव्हां तो परतला, तेव्हां ती जोगीण गोड बटाटयांची व रानटी फळांची त्यांची न्याहारी तयार करीत होती. खातांना कांहींशा खिन्नपणें ती म्हणाली, "ते कोण असतील व ते केव्हां येतील मला आश्चर्य वाटतं–आम्हाला न्यायला येणारे ते लोक? त्या तिकडे काय घडत असावं याचं मला नवल वाटतं." तिनें समुद्राकडे पाहिलं. "त्याला किती काळ लागणार याचं मला नवल वाटतं? मिस्टर अॅलिसन, तुला माहित आहे. आम्ही--आम्ही इथें मरूं शकतो आणि कुणालाच ते कळायचं नाहीं."

असं हें बोलणं त्याला आवडत नसे. तें त्याला अस्वस्थ करीत असे. तो उभा राहिला आणि त्यानें आपले तोंड पुसलें. आणि म्हणाला, "मी कांहीं मासे पकडण्याचा प्रयत्न करणार आहे. पक्षी पकडण्याच्या उपायाबद्दल देखील मला एक कल्पना सुचली आहे."

"छान," ती उत्तरली, "तूं जाशील तोंवर मी नदींत आंघोळ करीन." त्या उध्वस्त ठाण्याकडे जाण्यासाठीं तो खालीं टेकडीच्या बाजूनें निघाला. वाटेंत पक्ष्यांच्या संवयींचा अभ्यास करण्यासाठीं तो उभा राहिला, त्यांपैकीं कांहींना पकडण्याची योजना व मार्ग आंखीत. त्या बरोबर बरेच डुक्कर असावेत असं दिसत होतं. त्यानें तिघांना झुडपांतून अन्न शोधतांना पाहिलं होतं. जेव्हां जंगलांतून बाहेर पडून उपसागराकडे जाणाऱ्या वाटेवर त्यानें पाऊल टाकलं तेव्हां तो डुकरांचं मांस कसं मिळवायचं याचा उपाय मनांत ठरवित होता. मग आपला श्वास त्यानें रोखून धरला आणि पुनः मागे त्यानें जंगलांत उडी मारली. त्या तुटक्या तरीजवळ एक जहाज उभं होतं.

त्या डेकवर आणि त्या तरीवर जपानी लोक उद्योगमग्न झाले होते. उपसागरांत दूर लाटांवर दुसरी तीन जहाजें तरंगत होती. ती तर व तो बंगला यांच्या दरम्यान कदाचित् दोन डझन बंदुकधारी माणसे त्याच्याकडेच चाल करून येतांना त्यानें पाहिली.

सुमारें अर्धे मिनीट तो स्तब्ध उभा राहिला, हालतांच येईनासे होऊन. मग पाठ फिरवून त्वरेनें तो जंगलांत निघाला आणि पूर्ण वेगानें त्या छोटया नदीकडे धांवत गेला. जितक्या स्तब्धपणें पळतां येईल तितकं पळण्याचा त्यानें प्रयत्न केला. झाडांच्या शेंडयावरून साश्चर्य आवाज करीत ओरडणारे पक्षी त्यानें पाहिले. आणि जपानी लोकच त्यांचं निरीक्षण करणार नाहींत अशी त्यानें आशा केली. पुकारा करून त्या जोगीणीला इशारा देण्याची त्याला इच्छा होती परंतु शत्रू आपला आवाज ऐकतील अशी त्याला भीति वाटत होती. बसक्या झुडुपांवरून व ओंडक्यावरून उडया मारीत तो पुढें पळत गेला. शेवटीं त्या छोटया नदीवर जाऊन तो पोंचला. आणि त्यानें त्या जोगीणीला धुंडाळलें. प्रथम तो तिला पाहूं शकला नाहीं. पुकाऱ्याची अजूनहि भीति वाटत, तो नदींत वर धांवत गेला, त्याचे डोळे नदी व तिचे कांठ शोधीत होते.

अनुक्रमणिका

कांठावरील एका प्रचंड झाडाभोंवती तो धांवला, मग मागे नदीकडे, आणि तेथें ती होती,–अंग धूत; तिचे आंखूड पिवळे केस प्रकाशांत झळकत होते. तिची पाठ त्याच्याकडे होती. आणि नदी अर्धी अधिक तिच्या खांद्यापर्यंत आली होती. एका झुडुपामागें त्याने उडी मारली आणि तो ओरडला, "सिस्टर ! सिस्टर ! कुठें आहेस तूं ? जपानी लोक इथें आले आहेत !" त्याने एक हलकी आरोळी ऐकली, मग तिच्या आवाजाचा पुकारा होईपर्यंत कांहीं नाहीं. "येथें ... मी येथें आहे !"

तो धावला आणि त्याने तिला पाहिलं, पूर्ण वस्त्रावृत; गांगरून तिनें त्याच्याकडे टक लावली होती. तो ओरडला, "चल ये ! तिथें उभी राहूं नकोस ! त्यानें तिचे हात पकडले आणि वर टेकडीवर खड्ड्याकडे आपल्याबरोवर त्याने तिला ओढीत नेलें.

" आंत चल !"

"आंत चल !" सभोंवार सर्वत्र निरीक्षण करण्याचा यत्न करीत व त्याचवेळीं तिला आंत खड्ड्यांत जाण्याला मदतीचा हात देत, तो ओरडला. ती आंत अदृश्य झाली तेव्हां प्रवेशद्वार लपविण्यासाठीं फांद्या व वेली त्याने ओढल्या व तोडल्या. तो मागें उभा राहिला आणि त्यानें पाहिलें आणि तेथें खड्डा आहे असा कुणीही तर्क करणार नाहीं असें त्यानें मनाशीं ठरविलें. तो आपल्या खड्ड्याकडे गेला आणि आंत उतरला. नंतर प्रवेशिकेंतून त्याने आपलें हात वाहेर काढून ती लपविण्यासाठीं करतां येईल तितकें त्यानें केलें. त्यानें एक छोटीशीं उघडी जागा निरीक्षणासाठीं ठेवली.

"तूं ठीक आहेस नां, सिस्टर ?" त्यानें मंद आवाजांत विचारलं. कांहींशा मोठ्यानें त्याला पुनः विचारावं लागलं. नंतर तिनें कोणत्या एका शब्दानें उत्तर दिलं. तो 'होय' असावा असं त्यानें मानलं.

आपल्या खड्ड्यासमोरील जमिनीच्या प्रत्येक इंचाचं निरीक्षण करीत, एखादा आवाज येतो कां हें ऐकत, तो या मातीच्या भिंतीला टेकून उभा राहीला. मिनिटें गेलीं आणि पाहण्यासारखं वा ऐकण्यासारखं कांहीं नव्हतं. अॅलिसनला अधिक हायसं वाटलं आणि निरीक्षण करतां करतां, काय करायचं शत्रूनं योजिलं असेल याचा अंदाज घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. ते मुक्कामासाठीं आलें होतें कां ? हें जर खरं असेल तर त्याला व जोगीणीला पळून जाण्याची संधि क्वचित्‌च मिळणार होती. इथें एक किंवा दोन दिवस तें दडून राहूं शकले असते; परंतु लवकरच त्यांना पाणी व अन्न यांची गरज भासणार होती. कमी अधिक लवकर वा उशिरा शत्रू त्यांना शोधून काढील, आणि त्यानंतर–काय ?

याबावत अॅलिसन कांहीं करूं शकला असतां असं कांहीं नव्हतं, फक्त एवढचं कीं त्यांच्या दृष्टिपथांतून शक्य तितक्या दीर्घकाळ दूर राहणं. तो आणि ती जोगीण दिवसा आपल्या खड्ड्यांत राहूं शकली असती आणि आपल्या अन्नाचा शोध रात्रीं करायचा, असं झालं असतं. त्याला ही कल्पना आवडली नाहीं. रात्री ते पाणी आणूं शकलें असते; परंतु एखादा पक्षी किंवा एखादं जनावर खाली आणण्याची त्यांना फारशी आशा नव्हती. कदाचित् ते मासे पकडूं शकले असते. कदाचित् झाडावर झोपलेला एखादा पक्षी ते पाहूं शकले असते. यावरून त्यानें पुढें विचार केला कीं रात्रीं झाडावर त्याला फळें सुद्धां मिळूं शकतील. आणि त्याला किंचित् वरं वाटलं.

तो व सिस्टर अँजेला आजवर निष्काळजी राहिली, असं त्यानें ठरवलं. अशावेळीं उपयोगी पडलं असतं, इतकं अन्न खड्ड्यांत सांठविण्याचा त्यानें विचार करावयास हवा होता. जर बेटावर सर्वत्र जपानी लोक असतील तर रात्रीं सुद्धां बाहेर पडणें धोक्याचं ठरेल असा विचार करीत, त्यानें पुनः काळजी करण्यास सुरवात केली.

युद्धनौकेच्या भोंग्याच्या आवाजानें त्याला जाग्यावरून उडी मारायला लागली. तो आवाज इतका जवळ वाटला कीं त्या झाडातून मोडतोड करीत तें जहाज आंत येण्याची तो अपेक्षा करूं लागला. परंतु कांहींच हालचाल झाली नाहीं. सदान् कदा तो सिस्टर अँजेलाचा विचार करीत होता. त्याला तिच्याशीं बोलायचं होतं. कांहीं ठराविक गोष्टी न करण्याबद्दल तिला त्याला इशारा द्यायचा होता. योजना आंखणें त्यांना आतां जरूरीचें होणार होतें.

बाहेर लक्ष देत कांहीं काळ ताटकळला; आणि कांहींच घडलं नाहीं तेव्हां तो पिछाडीच्या भिंतीकडे गेला. आणि आपल्या सुरीने खणूं लागला. दोन खड्ड्यांच्या मध्ये समोर चार फूट मातीचें अंतर असावें असा त्यानें अंदाज केला. आपलं डोकं आणि खांदे आंत जातील एवढं मोठं विवर त्यानें तयार केलं. ती मऊ काळी माती सहज खणली जात होती. पहिल्यांदा त्यानें सुरीनें माती कापली, मग आपल्या हातानें खणली. वेळोवेळीं त्यानें खणायचं थांबवलं. तो बाहेर गेला आणि प्रवेशिकेच्या भोकांतून काळजीपूर्वक त्यानें पाहिलं. भिण्यासारखं त्याला कांहीं दिसलं नाहीं आणि तो पुनः परतून आपलं खणणं करूं लागला. शेवटीं ती सूरी भिंतींतून आरपार गेली आणि त्यानें सिस्टर अँजेलाची आश्चर्यभरीत किंकाळी ऐकली.

"तो मी आहे," तिचा चेहरा त्याच्याकडे पाहील एवढं रुंद असं तें भोंक करीत तो म्हणाला, "सिस्टर, मला तुझ्याशीं बोलायचं आहे, आणि तसं करण्याचा हाच मार्ग आहे. आपण जेव्हां बोलत वसूं तेव्हां तुझ्या बाजूनें त्या भोंकावर तूं कांहीं-तरी ठेव."

तिच्या उत्तरांत सुटकेचा आनंद होता.

"ओ, मी घाबरलें होतें. असं करायचा विचार तूं केलास याचा मला आनंद वाटतो. मी कांहींच ऐकूं शकत नव्हतें आणि तुला हांक मारण्याची मला भीति वाटत होती. तूं तो भोंगा ऐकलास? तूं कांहीं पाहिलंस?"

"नाहीं, परंतु ते कांहीं फार दूर असणार नाहींत. दृष्टीपलिकडे आम्हांला इथें राहिलेंच पाहिजे. सारा दिवस आम्हांला लपून








राहिलंच पाहिजे. आपण अगोदरच फार निष्काळजीपणा केला. मला अधिक ज्ञान असायला हवं होतं. मनुष्यानें--"

"ओ, त्याबद्दल तूं स्वत:ला दोष नाहीं लावायचा," ती मध्येंच बोलली. "तूं आजवर छान वागलास. मी एकटीच असतें तर काय करायचं हें मला समजलंच नसतं." मग मला अचंबा वाटेल इतकी ती हसूं लागली.

"तिथें पाण्यांत मी शांतपणें बसलेली आणि जपानी लोक माझ्या इतक्या जवळ येताहेत, याचा जेव्हां मी विचार करते--"ती पुन: हसली.

"होय" त्या विचारांत कांहीं गंमतीचं नाहीं, असं वाटून तो म्हणाला. तिला धोक्याची सूचना देण्यापूर्वी त्यानें तिला पाण्यांत पाहिली होती हें तिला सांगून टाकावं कीं काय याचं त्याला नवल वाटलं. किती गंमतीचं वाटेल तिला तें? त्या नदींत तिची उघडी पाठ व खांदे पाहिल्याचं त्याला आठवलं आणि ती किती नेत्राकर्षक दिसत होती याचा तो एकाएकी विचार करूं लागला. तिचे खांदे किती गुळगुळीत आणि वर्तुळाकार दिसत होते. गोलाकार स्त्रीचे खांदे. त्यानें आपल्या जिभेनें आपल्या ओठांना स्पर्श केला. मग स्वत:ला आवरलं आणि आपलं डोकं हालवलं. निर्धारानें मनांतील विचार हुसकावून देत स्वत:लाच तो त्या विचाराबद्दल स्तब्धपणें शिव्याशाप देऊं लागला.

"तूं तहानलेली नाहींस अशी मला आशा आहे." तो म्हणाला, आपल्या आवाजानें एक हळूवार स्वर धारण केला आहे हें लक्षांत न घेतां. "आज रात्रीं बाहेर पडून मी कांहींतरी पाणी मिळवीनच. यापूर्वीच कांहीं आपल्या खड्ड्यांत मी ठेवायला हवं होतं. मी कमालीचा मूर्ख मनुष्य होतो."

"मिस्टर ॲलिसन, तूं काळजी करायचं सोडून दे. तुझ्यावर कांहीं दोष नव्हता. मी पाण्याचा कांहीं विचार केला नव्हता. आणि मी तहानलेली किंवा भुकेलेली नाहीं. त्याची काळजी करायला मागाहून आपल्याला भरपूर वेळ मिळेल."

एक तीक्ष्ण, भिवविणारा बंदुकीचा आवाज हवेंत उमटला. आपल्या खड्ड्याच्या प्रवेशदाराकडे त्यानं उडी मारली आणि वेलींतील त्या भोंकांतून त्यानं काळजीपूर्वक पाहिलं. पानसुद्धां हालत नव्हतं. स्तब्धतेंतून दुसरा एक बार हवेंत घुमला. त्या छोट्या नदीकडून तो आला, असं त्यानं ठरवलं.

"शिकार, मला वाटतं" तो स्वत:शींच म्हणाला. बाहेर जंगलांत पहात व ऐकत तो प्रवेशद्वाराकडे थबकला. जंगल स्वत:च निस्तब्ध झालं होतं. पुन: जंगलांतील नादनिनाद सुरूं झाले. तेव्हां दोन खड्ड्यांच्या मधील भोंकाकडे जाणं त्याला सुरक्षितपणाचं वाटलं. आणि तो ओरडला, "सिस्टर ! तूं कांहीं पाहिलंस कां ?"

"नाहीं !"

"छान. मी लक्ष देत राहीन."

ॲलिसन आपल्या प्रवेशिकेजवळ परतला आणि त्या पानांतून व वेलींतून लक्षपूर्वक पहात व ऐकत तो तिथें वांकून उभा राहिला. तो विचारांत गढून गेला होता. वेळोवेळीं तो भरपूर दीर्घ वेळ लक्ष देत तो तिथें थांबल्यावर सिस्टर अँजेलाशीं एक-दोन शब्द बोलण्याची तो सवड काढीत असे. कधीं तो त्या छोट्या जागेंत, व्यायामासाठीं व पहाऱ्यांत बदल म्हणून शतपावली करीत असे.

सिस्टर अँजेलाला काय वाटत असेल याबद्दल तो नवल करीत होता. त्याच्याचप्रमाणे ती सुद्धां त्या विवरांतील एक कैदी होती. पिंजऱ्यांतील जनावराप्रमाणे तिला वाटत होत काय? जगापासून दूर बंदिस्त अशी कित्येक वर्षे तिने घालविलीं असल्यामुळें, ती त्याकडे त्याच्यापेक्षां कमी लक्ष देत असेल असं त्याला वाटलं. स्वत:च्या जीवनांतील गूढतेंत गुरफटलेल्या या पवित्र स्त्रियांबद्दल लोकांना काय वाटत असेल? त्या जीवनपद्धतीबद्दल असं काय होतं कीं जें स्त्रियांना आपल्याकडे खेंचीत होतं? आपले केस कापून घेत, स्वत:ला बेढब काळ्या झग्यांत गुंडाळून घेत, इतर मुलींप्रमाणें कधींच समारंभ वा चित्रपट वा नृत्य यांना न जाता? तरी पण तुम्हीं त्यांना अचानक आंघोळ करतांना पाहिलंत आणि त्यांचें खांदे व हात पाण्यांत सुंदर दिसत होते--अशा? आपल्या विचारांना शिव्या देत, तो आपल्या खड्ड्याच्या प्रवेशद्वाराकडे पावलें टाकीत गेला आणि बाहेर तिकडे जपानी लोक आले आहेत याची स्मृति बळें बळें मनावर लादीत तो जंगलाकडे टक लावून पहात राहिला. असा तो दिवस गेला.

(क्रमश:)

# पहिला नंबर झिंदाबाद

**पहिला नंबर झिंदाबाद ! कुमार बबन झिंदाबाद ! गुरुवर्य धोंड आणि बारलिंगे झिंदाबाद ! !**
**अवघ्या महाराष्ट्रांत एस्. एस्. सी. त पहिला नंबर महाराजा ! सामान्य गोष्ट नाहीं. सत्कार, खास अंक, दौरे, कोनशिला समारंभ, उद्घाटनें — अगदीं मंत्र्यांचे भाग्य बबनच्या वांट्याला आले. तो त्यांत बुडून गेला. — पार बुडून गेला ! !**

--दि. त्र्यं. कुलकर्णी एम्. ए.

**मिरवणूक** शाळेजवळ येताच पुन्हां एकदां प्रचंड जयघोष, फटाक्यांचे आवाज, वाजंत्रीवाल्यांची जुगलबंदी होऊन माणसांचा एक प्रचंड लोंढा शाळेच्या आवारांत घुसला.

"पहिला नंबर झिंदाबाद !" "कुमार बबन झिंदाबाद !" "श्रीचौरंगीनाथ हायस्कूलचा विजय असो !"च्या ललकाऱ्यांनीं आज दिवस उगवतांच सारं संगमपूर दणाणलं होतं. साऱ्या संगमपुरावर आनंदाची बरसात करणारा बबन साऱ्या संगमपूरचं आजचं आकर्षण होतं. संगमपूरचे पहिलवान दत्तोबा रानबोके यांच्या खांद्यावरून एक आगळंच जग तो टुकुटुकु पहात होता. "कुमार बबन झिंदाबाद"ची ललकारी उठतांच दत्तोबाच्या शेजारीच गुलालाचे तबक घेऊन चालत असलेला दत्तोबाचा एक चेला बबनवर गुलाल उधळी. यंदाच्या एस. एस. सी. परीक्षेंत महाराष्ट्र राज्यांत पहिला नंबर पटकावणारा बबन संगमपूरच्या श्रीचौरंगीनाथ विद्यालयाचा एक तेजस्वी विद्यार्थी होता. साऱ्या महाराष्ट्रांत त्याने आपल्या यशानें शाळा, शिक्षक आणि गांव यांचं नांव आज मोठं केलं होतं.

मिरवणूक शाळेच्या फाटकापाशी आल्याबरोबर बबननें दत्तोबांच्या खांद्यावरून उडी टाकली. आणि गर्दीतून धांवत धांवत तो मुख्याध्यापकांकडे गेला. मुख्याध्यापक बरवे बबनच्या विजयाचा सोहोळा डोळे भरभरून पहात होते. बबनचे मार्गदर्शक म्हणून ज्यांचा बोलवाला गांवांत बराच झाला होता ते गुरुवर्य धोंड व गुरुवर्य बारलिंगे 'टीचर्स रुम'मध्यें पुण्या मुंबईहून आलेल्या वातमीदारांबरोबर चर्चा करीत होते. शाळेच्या आवारांत व रस्त्यावर असलेल्या गर्दीतून मधूनमधून अजूनहि उत्साही विद्यार्थी घोषणा करीत होते. बाहेरील गर्दी, गोंगाट, धांवपळ कमी झाली नव्हती.

पी. टी. शिक्षक सोंगटे गुरुजींनी शिट्टीचा कर्कश आवाज काढून सर्वांचे लक्ष वेधले. "सर्वांनी घरी जाताना साखर घेऊन तोंड गोड

अनुक्रमणिका

करून जावें." श्री. सोंगटे यानीं सूचना दिली. "दूसरी सूचना, उद्यां सायंकाळीं शाळेच्या वतीनें होणाऱ्या कुमार ववनच्या सत्कारास सर्वांनी यावें." धनजीशेटनी शाळेस या प्रसंगी दिलेल्या एक गोण साखरेपैकीं दोन मोठे डवे 'चहाक्लब'साठी उपासे गुरुजीनी आधीच काढून ठेवले होते. उरलेल्या साखरेचे वांटप शाळेच्या फाटकापाशी सुरू झाले.

वातमीदारांबरोबर वार्तालाप करणाऱ्या गुरुवर्य धोंड व वार-लिंग्यांच्या शेजारी आतां 'चिलया' या संगमपुरातील लोकप्रिय साप्ताहिकाचे संपादक श्रीयाळराव ससाणे व ववन हेहि येऊन वसले. ववनला 'वातमीदार' या नांवाचा प्राणी आज जवळून पहावयास मिळाला. गुरुवर्य वार्लिंगे नसते तर त्याचा गोंधळच झाला असता. वातमीदारांनीं विचारलेल्या प्रश्नांची उत्तरें कधी तो स्वतः देई तर कधी गु. वार्लिंगे यांच्याकडे वघे. गोंधळलेल्या ववनच्या मदतीस गु. वार्लिंगे तत्परतेने येत असत. "ववनराव, या पुढें घ्यावयाच्या उच्च शिक्षणाविषयीं तुम्ही काय ठरविले आहे ?" एका वातमीदारानें विचारले. "पुढील शिक्षणा संबंधींचा निर्णय मी माझे थोर शिक्षक गुरुवर्य धोंड व गुरुवर्य वार्लिंगे यांच्या सल्यानेच घेणार आहे." ववनने धोंड व वार्लिंगे यांच्याकडे वालभावानें दृष्टि टाकीत उत्तर दिले. "तुमच्या यशाचे श्रेय तुम्ही कोणास देऊं इच्छितां?" मुंवईच्या वातमी-दारानें विचारले. या प्रश्नावरोवरच धोंड व वार्लिंगे यांचे डोळे ववनवर खिळले. ववननें गुरुद्वयांच्या डोळ्यांतील भाव तात्काळ ओळखला. "गुरुवर्य धोंड व गुरुवर्य वार्लिंगे हेच माझे शिल्पकार आहेत." असे उत्तर देऊन बबननें विजय व गुरुभक्ति दाखविली. ववनच्या उत्तरानें गुरुवर्य वार्लिंग्यांच्या चेहऱ्यावर उमटलेली मिस्किल हास्याची एक छटा व गु. धोंडांनी सोडलेला सुटकेचा निश्वास ववनला दिलासा देत होता. दत्तोवा रानवोके तेथें आले नसते तर ही मुलाखत लांवली असती. "श्रीयाळराव, समद्यांच पेपरांत ववनचा जंक्शन फोटु याया पाहिजे. पुन्या काडं पव्लिकला कळुंद्या कीं पुन्या भाईर बी फसक्लास मास्तर हाइत" रानवोक्यांनी खिडकींतून तंवाखूची पिचकारी मारीत ससाण्यांना सल्ला दिला. "हे काय बोलणं झालं, पहिलवान, अहो, उद्यां संगमपूरचं नांव साऱ्या महा-राष्ट्रांत गाजणार. घरोघर बबनचं नांव निघणार." वातमीदार रानवोक्यांना म्हणाले. सारे जण उठले तेवढ्यांत गु. वार्लिंगे यांनी एका वातमीदारास वाजूला घेऊन त्याच्या हातात कांहीं कागद दिले. थोडा वेळ त्याच्या कानांत कांहीं कुजवुज केली "चला वार्लिंगे गुरु" अशी धोंडाची हांक कानावर येताच धोंडांसह तेहि वाहेर पडले.

साप्ताहिक 'चिलया' म्हणजे संगमपूरचा 'टाइम्स.' 'चिलया'चे जनक व संपादक श्रीयाळ मलकु ससाणे हे चौरंगीनाथ विद्यालयाचे व गुरुवर्य धोंड व गुरुवर्य वार्लिंगे यांचे पराक्रमी शिष्य. मॅट्रिक नसले तरी स्वतंत्र धंद्यांत त्यांनी मोठे यश मिळविले. संगमपूर तालुक्यांत पिठाच्या पांच गिरण्या अत्यंत यशस्वीरीत्या चालवून ते गिरणीमालकहि झाले होते. धंद्यांतील यशावरोवर आतां त्यांच्याकडे पुढारीपणहि आले होते. संगमपुरात 'चिलया'च्या निमित्तानें निर्माण केलेले 'पीठ'समाप्याच्या गुरुजनांना नेहमीच उपयोगी पडे. चिलया हें नांव तर गु. वार्लिंगे यांनीच सुचविलें होते.

एस्. एस्. सी. निकालाच्या दुसऱ्या दिवशीं सर्व प्रमुख दैनिकांत कु. ववन, गुरुवर्य धोंड, गुरुवर्य वार्लिंगे यांची छायाचित्रे, मुलाखती, परिचय कमीअधिक प्रमाणात प्रसिद्ध होऊन या त्रिमूर्ति प्रसिद्धीच्या तेजांत तळपूं लागल्या. कु. ववन व त्याचे शिल्पकार गुरुद्वय यांचे सत्कार गांवोगांव, शाळाशाळांत, जाती जातीत टोलेजंगपणे होऊन त्यांची वृत्तें प्रसिद्ध होऊं लागली.

कु. ववन, गुरुवर्य धोंड व वार्लिंगे यांच्या प्रसिद्धीसाठीं श्रीयाळ-रावांनी 'चिलया' चे खास अंक, ववन सत्कार योजना, गुरुवर्य धोंड-वार्लिंगे गौरव समारंभ इत्यादि कार्यक्रमांची आखणी, वार्लिंगे व दत्तोवा रानवोके यांच्या मसलतीने निश्चित करून तिची वजावणी सुरू केली. सारा संगमपूर तालुका ठिकठिकाणच्या सत्कार समारंभांनी कित्येक आठवडे दणाणून सोडला. 'चिलया' कचेरीत गावोगावाहून सत्काराची निमंत्रणे येऊन पडूं लागली.

ववनचे वडील गोपाळराव पाटील निकालाच्या दिवशीं नांदूरहून संगमपूरला आले होते. वरोवर ववनची आई गऊवाई होती. लिहिता वाचता न येणाऱ्या या शेतकरी कुटुंवाला संगमपुरांतील धामधुमीचं विलक्षण नवल वाटलं. गुरुवर्य धोंडांच्या घरीं डोळ्यांत पाणी आणून त्यांनीं शिकवणी-बद्दल त्यांचे उपकार मानले. धोंडांना त्यांनीं सोन्याची आंगठी व त्यांच्या पत्नीस भरजरी लुगड्याचा अहेर केला. एरव्ही अशिक्षित शेतकऱ्यावरोवर सहसा न वोलणारे धोंड आहेर पाहताच गोपाळ-राव पाटलांच्या गळ्यांतच पडले. जिकडे तिकडे सत्कार समारंभाची धमाल सुरू असल्यामुळें गोपाळरावांनी ववनला नांदूर येथें येण्याचा आग्रह केला नाहीं. ते समारंभ संपतांच नांदूर येथें येण्याचें निमंत्रण देऊन त्यांनीं सर्वांचा निरोप घेतला. ववनच्या कीर्तीने सुपासारख्या झालेल्या त्यांच्या अंतःकरणांत ववनच्या भविष्यकाळासंबंधी विचार मघून मघून यायचे. पण गऊवाई म्हणायच्या, "हायेत एवढे शिकले सवरलेले मास्तर ववनच्या पाठीशी, आपण अडाणी काय डोस्कं चालविणार" "अग ते खरं, पण या जत्रा उरसागत उठलेल्या वावटळीत ववनचं डोस्कं तरी लोकांनीं शावुत ठेवलं म्हंजे वरं" नांदूरचा गांवगाडा हाकणारे गोपाळ पाटील म्हणायचे. नांदूरला गेल्यावर तर सर्व गांवकऱ्यांनी गोपाळ पाटलापाशी ववनचे कौतुक केले व ववनच्या सत्काराचा विचार पक्का केला.

संगमपुरांतील छोटे सत्कारसमारंभ झाल्यावर मोठमोठ्या समारंभाच्या योजना निघूं लागल्या. मराठा शिक्षण साहाय्यक मंडळ, प्राथमिक शिक्षक संघ, सर्वोदय केंद्र, तालीम संघ, चौरंगी-नाथ वाचनालय, निरनिराळे राजकीय पक्ष, नोकरांच्या संघटना, देवळांचे ट्रस्टी, सत्कार व वक्षिसाच्या रकमेचा विचार करूं लागल्या. त्यातच श्री. ससाणे यांनीं 'चिलयाचा' कुमार ववन खास अंक काढून वातावरण उत्साही केले.

त्या खास अंकाचे मुखपृष्ठ पाहून प्रत्येक वाचकाच्या तोंडून 'धन्य ते गुरु आणि धन्य तो शिष्य ' असे उद्गार निघाल्या-वांचून राहिले नसतील. 'गुरुवंदन' अशा ठळक शीर्षकाखाली सबंध पानभर एक छायाचित्र दिले होते. आंतील पानांवर





संगमपूर तालुक्यांतील कवी, शाहीर, ववनचे शिक्षक, सौंगडी यांनी लिहिलेल्या साहित्यानी नटला होता. कोणी ववनला भावी मंत्री म्हटले, कोणी त्याला संशोधक, शास्त्रज्ञ, पंडित, होईल असा आशिर्वाद दिला. संगमपूरचे गावरान कवि 'कौतिक' यांनी लिहिलेली 'ववनप्रभु' ही कविता तर कांहीं शिक्षकांच्या मतें शाळेत प्रार्थने ऐवजी म्हणण्यालायक होती. याच अंकात ववन व त्याचे गुरु यांच्या ठिकठिकाणी झालेल्या सत्काराचे वृत्त होते. सत्कारसमारंभास एकटा ववन कधी जाई तर कधी त्याच्या सत्कारसमारंभास तो न जाता गुरुवर्य धोंड व गुरुवर्य बार्रलिंगे हे दोघेच जायचे. एकाच वेळी सगळीकडे सर्वांना जाणे शक्य नाही पण समारंभ होणे जरूर आहे अशावेळी प्रत्येकजण वेगवेगळ्या समारंभास हजर रहात असत. ववनला या कार्यक्रमामुळें खाजगी आयुष्यच उरले नव्हते. तो त्याचा उरला नव्हता. मोठ्या समारंभास गुरुजींबरोबर जाणे, निमुटपणे धोंडगुरुजींच्या शेजारी वसणे, व गुरुवर्य बार्रलिंगे यांनी लिहून दिलेले गुरुचरित्रपर छोटेसे भाषण करणें हाच त्याचा कार्यक्रम होता. त्याच्या लीनतेची, गुरुभक्तीची सर्वत्र तारीफ होत होती.

खास अंका बरोबर, पुण्याच्या दैनिकांत त्याच्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या एका दीर्घ लेखांत, अभ्यासपद्धति, गुरुभक्ति, भावस्पर्शी आठवणी वाचून त्याला गुरुवर्य बार्रलिंग्याच्या कल्पनाशक्तीने धक्काच दिला. त्याच्या नांवावर आणखी काय साहित्य गुरुजीनी लिहून वृत्तपत्रात दिले असेल याचा विचार त्याच्या मनाला बोचत होता. आजवर झालेले सत्कार समारंभ व या पुढील आठ दिवसांचा 'चिलयात' प्रसिद्ध झालेला कार्यक्रम पाहून तो हावकलाच होता. त्याला उत्साह उरला नव्हता, त्याची वेहोषी जाऊं लागली होती. भवितव्याचा गंभीर विचार त्याच्या मनाच्या गाभाऱ्यांत घुमत होता. प्रसिद्धीपासून आजवर दूर असलेल्या त्याच्या कोवळ्या व्यक्तिमत्वावर, स्तुति, शावासकी, वहाव्वा आघात करीत होती. प्रसिद्धीचे, मान्यतेचे, मोठे मोठे धोंडे त्याच्या कोवळ्या मनाचा चेंदामेंदा करीत होते. त्याला वाटे संगमपूर सोडून तडक नांदूरला जावे. आईच्या कुशींत तोंड खूपसून रडावे. वडलांवरोवर शेतांत मोट ओढावी. गावांतील म्हाताऱ्या वेलदार नानाच्या गोष्टी ऐकाव्यात. पहांटे जात्यावर दळणाऱ्या आईच्या मांडीवर डोके ठेवून, ओसरीवरील चांदण्याच्या कवडशांत, पहाटच्या झोंवऱ्या वाऱ्यावरोवर तिची गाणी ऐकावीत. पण ती आता नुसती कल्पनाच होती. पहिला नंबर पटकावल्याची शिक्षा वक्षिसावरोवर निमुटपणें घेणे भाग होते.




रात्रीं धोंड गुरुजींच्या व्याख्यानाहून परत येताना ववनला नांदूरचे सरपंच दादाभाऊ पाटील भेटले. परीक्षेच्या निकाला नंतर त्यांची ही पहिलीच भेट. दादाभाऊंनीं ववनला पोटाशीं घट्ट धरले. "ववन, नांदूरला कधीं यायचं. आपल्या गावांत तुझा आणि सर्व शिक्षकांचा सत्कार करायचं ठरलंय. केव्हां जमेल तुला यायला." दादाभाऊंनी विचारले. "दादाभाऊं, ते मला नाहीं सांगता येणार 'चिलया'च्या कचेरीत बार्रलिंगे सर आहेत त्याना विचारून वेळ ठरवा. पण कशाला आतां हा समारंभ करतां, पुष्कळ झाले आहेत सत्कार" ववन म्हणाला. पण दादाभाऊंनी ते न ऐकतां त्याला वरोवर घेऊन 'चिलया'च्या कचेरीत बार्रलिंगे याना भेटून नांदूर समारंभाची तारीख व वेळ पक्की केली. रात्रीं झोंपताना ववनच्या डोक्यांत अनेक विचारांचे काहूर माजले होते. गुरुवर्य धोंड, बार्रलिंगे, 'चिलया', दत्तोवा रानवोके, ससाणे, मिरवणूक, सत्कारसमारंभ, पहिला नंवर, वक्षिसे. या प्रत्येका भोवती त्याच्या चिमण्या अंतःकरणातील विचारांची एकेक तार गुंडाळली जाई. या साऱ्या तारांची गुंतागुंत होई आणि तो ती सोडविण्याचा प्रयत्न करी–किती तरी वेळ त्याला झोप लागली नाही. मधेच तो गेल्या प्रत्येक वर्षी पहिला आलेल्या मुलाचा अनोळखी चेहरा डोळ्यापुढें आणण्याची धडपड करी. त्याला वाटे त्या प्रत्येकाला विचारावें "तुझे असेच सत्कार झाले काय? तूंहि प्रसिद्धीच्या धोंड्यांनी जखमी झाला होतास काय ? तुझे शिक्षक असेच अलौकिक होते काय ?" कुणीतरी अस्पष्ट चेहऱ्याचा वालक त्याच्यापुढे येऊन नुसता हंसल्याचा भास होई. आणि मग त्याला वाटे आपलंच येवढं स्तोम कां माजलं ? एक मोठं प्रश्नचिन्ह त्याच्या डोळ्यांपुढें आलं. ते खूप मोठे झालं. ते आडवं झालं. त्याचे कडें त्याच्या गळ्यांत गेले आणि रेघ छातीपासून पायाच्या आंगठ्यापर्यंत पसरली. ववन झोपला.

सकाळीं त्याच्या मामेभावांनी 'चिलयाचा' गुरुवर्य धोंड खास अंक आणून त्याच्या पुढे ठेवला. 'कुमार ववनचे शिल्पकार' अशा ठळक मथळ्याखालीं सबंध पानभर, हात जोडून उभे असलेल्या धोंड गुरुजींचे छायाचित्र ववनला दिसले. श्री. ससाणे यांच्या नांवावर लिहिलेला एक लेख छापण्यात आला होता. त्यांत मध्यभागी ससाणे व धोंडगुरुजींनी छोटी छायाचित्रे होती. ससाण्याच्या छायाचित्राखालीं



अनुक्रमणिका

'गिरणीतून पीठाकडे' व धोंडाच्या चित्राखाली 'सर्वज्ञःसहि हेरंबः' अशा काव्यमय व ओजस्वी शब्दांची ओळ टाकली होती. श्री. वारलिंगे गुरुजींचा हात ससाण्यांच्या लेखावरून फिरला असल्यामुळें लेखाचा दर्जा उंचावला होता. चरित्र वाङमयांत हा लेख अमर झाल्याशिवाय राहणार नाही असें संगमपुरांत बोलले जात होतें. गुरुवर्य धोंड तर अंक वाचून खूपच झाले. हा अंक महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख शाळांकडे पाठविण्याची त्यांनीं व्यवस्था केली.

नांदूर गावांत ववन सत्काराची तयारी पूर्ण झाली. गांवची वेस लता पल्लवांनीं सुशोभित केली होती. गावच्या चावडी समोर छोटेसे व्यासपीठ उभारले होते. वेशीपासून चावडीपर्यंतच्या रस्त्यावर कमानी केल्या होत्या. चावडी समोर व्यासपीठावर लावलेल्या तांबड्या कापडी पाटीवर 'गुरु-शिष्य गौरव-समारंभ' हीं सोनेरी बेगडाची अक्षरें चमकत होती.

सकाळीं ९ च्या सुमारास नांदूरकर मंडळी वेशीपाशीं जमली. ववन व त्याच्या शाळेंतील सर्व शिक्षक आज नांदूरला येणार होते. गांवकरी त्यांच्या स्वागतासाठीं उभे होते. सरपंच दादाभाऊ पाटील, ववनचे वडील गोपाळ पाटील व त्यांचे भाऊबंद, म्हातारा नाना वेलदार, वारुळ वाडीचे नागू भगत, धोंडी मुलाणी, आबा लव्हार, तमासगीर गेन्या वांगर, नांदूर मराठी शाळेचे हेडमास्तर कुंभार गुरुजी सकाळच्या उन्हात गटागटाने गप्पा छाटीत संगमपूरहून येणाऱ्या मोटारीची वाट पहात वेळ काढीत होते. सारेजण ववनला वघण्यास उत्सुक होते.

"पाव्हन्या म्होरं गांवची सोभा करु नका बरं" नाना वेलदार तरण्या पोरांना उद्देशून म्हणाला. "नाना तूंच व्हंय आतां आमचा मास्तर अन् घे तुज्या साळंत आम्हाला." नाग्या तंबाखूची पिचकारी टाकीत वोलला. "नाग्या, तुला तर ढिपुटीच कराया हवं. साळंत कशाला आतां जातो. पर आज त्वांड संभाळ जरा" मारत्या पेंटरनी नाग्याला चेप्टेत इषारा दिला. गेन्या वांगर तरातरा पुढे आला आणि म्हणाला "काहो सरपंच आजला अध्यक्ष कोन होनार?" "गेन्या हे काय वोलणं झालं, आज सरपंच दादाभाऊच अध्यक्ष व्हायला पायजे" पंचायतीचा मेंबर आबा लव्हार म्हणाला. "ते गैर होईल. आजचा मान नाना वेलदारा कड गेला पाहिजे." सरपंच दादाभाऊ पाटील म्हणाले. "वरोबर आहे, नाना वेलदार गांवांतला वडील माणूस आहे" गोपाळ पाटील म्हणाले. "वरोबर हाये, नानालाच वसवा आज खुर्चीवर" सर्वजण म्हणाले. "पाटील मला कंशावाई मिरविता शिकल्या सवरल्या माणसांत. गाढवा संग समदा जन्म घालविला, अन् दगड फोडले या हातानं. लेखण कशी ती ठावंच नाही जिंदगानीस. दडग धोंडं घडविलेल्या वेलदाराला ववनच्या मास्तरां म्होरं काय वोलता येनार, खुशालशेट नाय तर दादाभाऊनंच ते काम करावं". म्हातारा वेलदार नम्रतेने बोलला. गेन्यांतला कवि आणि शाहीर जागा झाला, आणि केसांची झुलपं पटक्यात कों ंत नाना वेलदाराला म्हणाला "अरं नाना, तू तर नांदूरचा शेलार मामा, मास्तर लोक साळंत माणसं घडवितात, तूं तर भगवंताच्या मूरती घडवितो. मास्तरांच्या हातून एखादा 'ववन' तयार होतो वाकी प्वारं

## स्फुलिंग........

### धनुर्धर

पति हा संसार-रथांतला धनुर्धर वीर असून
पत्नी ही त्याची सारथी आहे.
पतीच्या साऱ्या नाड्या सारथ्याच्या
म्हणजे पत्नीच्या हातांत असतात.
आणि तो धनुर्धर वीर
आपला बाण सोडीतच राहतो.
सोडीतच राहतो.
सारथ्याच्या तालावर शरसंधान करीत !
बिच्चारा धनुर्धर वीर ! ***

### मौलिक क्षण

आयुष्याचे क्षण मौलिक आहेत.
ते सत्कारणीं लावा.
असं सारेचजण सांगतात.
पण सारेच क्षण मौलिक मानले
तर त्यांना पुरतील अशीं सत्कारणं कोणतीं,
आणि कांहीं क्षण मौलिक मानले
तर त्यांच्या योग्यतेचीं (!) सत्कारणं कोणतीं,
हें माहीत नसल्यामुळं,
कुणी निश्चितपणें सांगत नसल्यामुळं
मिळतील ते क्षण मौलिक मानून
आणि त्या क्षणांना सांपडतील
तीं कारणं सत्कारणं समजून
माणूस आपले क्षण
कसेतरी, केव्हांतरी कारणीं लावीत असतो,
'याला जीवन ऐसें नांव !' ***

### आदर्श

आपल्याला आदर्श पति मिळाला आहे,
अशी ज्या पत्नीची समजूत असते,
ती आदर्श पत्नी होय,
अशी त्या पतीची समजूत असते.
म्हणजे शेवटीं आदर्शाची कल्पना
मनुष्य स्वतःवरूनच करतो
आणि ती कल्पना बरोबर आहे,
हें दुसऱ्याकडून कबूल करवून घेतो.
तो तरी काय करणार म्हणा !
त्याच्यापुढचे आदर्शहि तसेच असतात ना !

— दामोदर नाईक



अनुक्रमणिका

म्हंज खडी अन् डवराचीच भर. तूं काय शेंदूर भोगायचे दगड तयार केले नाहीस. शिकला असतास तर विग्लंडमधेवी झेंडा लावला असतास. तूंच आज अध्यक्ष व्हाया पाहिजे ववनला वी वरं वाटल" कुंभार गुरुजीनींहि गेन्याला दुजोरा दिला. अध्यक्षाची निवड सभा सुरू होण्यापूर्वीच कायम झाली. येवढ्यांत मोटारीचा हॉर्न वाजला. सर्वांनीं संगपूरहून येणाऱ्या मोटारीकडे माना वळवल्या. दादापाटलांनी वाजंत्रीवाल्यांना इषारा दिला.

एक जीप वेग कमी करीत वेशी समोर जमलेल्या गर्दीच्या दिशेनें आली. दादापाटील, नाना बेलदार, खुशालशेट ववनचे वडील जीपपाशी गेले. "पहिला नंवर झिंदावाद" "कुमार ववन झिंदावाद" अशा घोपणांनी नांदूरचा गावकूस दणाणला. जीपमधून गुरुवर्य धोंड व गुरुवर्य वार्रालगे खालीं उतरले. सरपंचांनीं त्याना हार घातले. "वाकी मंडळी अन् यायला अजून वेळ आहे काय ?" दादाभाऊ पाटलांनी पाहुण्याना विचारलं. "छे, छे, वाकी शिक्षक कोणी येणार नाहींत. आणि ववन तर आधीच इकडे आला असें आम्हांला कळले." वार्रालगे यांनी खुलासा केला. धोंडांनी आश्चर्य व्यक्त केले.

ववनचे वडील गोपाळ पाटील दोघा गुरुजीना कडकडून भेटले. ववनच्या न येण्याने त्यांना धसकाच वसला. त्यांनी काळजीच्या स्वरात धोंड गुरुजींना विचारले, "मास्तरसाहेव ववनचा पत्ताच नाही. कांहीं तरी घोटाळा झालेला दिसतोय, मला वाटतं सभा जरा अवकाशानें घेतलीत तर नाहीं का चालणार ? गु. धोंड समजावणीच्या स्वरांत त्याना म्हणाले, "काळजी करूं नका पाटील येईल ववन, त्याला इथे कार्यक्रम आहे हे माहीत आहे. सभा थांवविण्याची जरुर नाहीं. आम्हांला आणखी एका सत्कारास तावडतोव जायचे आहे. आपण समारंभ उरकून घेऊं." गावांतील कारभारी मंडळी आश्चर्यानें एकमेकांकडे पाहूं लागले. ववनचे वडील तावडतोव घरीं गेले. दादाभाऊ पाटीलांनीं सभेच्या ठिकाणीं चलण्यावद्दल सर्वांना सांगितले. गुरुवर्य धोंड, वार्रालगे, गांवांतील कारभारी, शाळकरी मुलें व शेकडो गांवकरी लेझीमच्या ताफ्यामागून मिरवत जाऊ लागले. प्रत्येक कमान ओलांडतांना मुलांनी कमानीवर लटकवलेल्या कापडी पाटीवरील घोषणा मोठ्या आवाजांत केल्या. मिरवणूक व्यासपीठापाशी आली. मोकळ्या जागेत सगळ्यानी दाटीवाटीनी वसून घेतले. वायकांनीं, मुलीनी व्यासपीठ दिसेल अशा वेताने वैठक मारली. व्यासपीठावरील खुर्च्यांत गुरुवर्य धोंड, गु. वारलिगे, दादाभाऊ पाटील, नाना वेलदार ही मंडळी वसली. सरपंच दादा पाटलांनीं गुरुजींचे स्वागत करून नाना वेलदार यांनी सभेचे अध्यक्ष व्हावे असे सुचवले. नाना वेलदार, गुरुवर्य धोंड व गुरुवर्य वार्रालगे याच्यामध्यें अध्यक्षीय खुर्चीत वसला. सभेला सुरवात झाली. मुलींनी ईशस्तवन म्हटल्यावर गेन्या तमासगीरानें कवि कौतिक यांची 'गुरुविण अन्य नको वरदान' ही कविता ढंगदार चालीवर हावभाव करीत म्हणून दाखवली. गेन्याने सपाट्याला आपल्या गायनानेच सभा जिंकली. गाणं संपवून तो आपल्या जागी वसला. नाना वेलदारांनीं सर्वांना शांत राहण्यास सांगून 'आतां आपल्या गांवचे खुशालशेट भाशान करतील ते सर्वांनी ऐकावे." असे सुचविले.

खुशालशेट म्हणाले "मास्तरी हा धर्म नसून एक व्यापार आहे. त्या व्यापाराला हल्ली तेजी आहे. शाहाणी माणसं त्यात पडतील तर हा व्यापारहि चोख चालेल. आपण आडाणी लोक कुंभार मास्तरला कांहींहि वोलून त्याची थट्टा करतो. पण हे खरं नाहीं. मास्तरकीच्या व्यापारात बी सट्टा असतो—एकाद्याला जमतो एकाद्याला नाहीं जमत. ववनच्या मास्तरानी मोठा सट्टा केला. ते मोठे झाले. सट्ट्यालाहि धाडस लागतं." शेटजींनी ववनला पंचवीस रुपयांचे रोख वक्षिस जाहीर केले. मळकट कोटाच्या आंतल्या खिशातून नोटा काढून त्यांनीं वेलदार नानापाशी दिल्या.

गुरुवर्य धोंड व वार्रालगे यांना शेटजींचे भाषण आवडले नसल्याचे त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होते. ते दोघेहि मागे वळून मारत्या पेंटरने काढलेले 'गुरुशरण' हें चित्र न्याहाळीत होते. खुशाल शेट नंतर वेलदार नानानी. सरपंच दादाभाऊ पाटलाना वोलण्यास सांगितले. त्यांनीं ववन व त्यांचे शिक्षक यांनीं नांदूर गांवाचे नांव मोठे केल्यावद्दल आनंद व्यक्त केला वोलण्याची फारशी सवय नसल्यानें त्यानी गेन्या वांगर यास सविस्तर वोलण्यास सांगितलें. टाळ्यांच्या गजरांत गेल्याने वोलण्यास सुरवात केली—

"नांदूरच्या समारंभाची सुपारी घेऊन मास्तर साहेवांनी गावावर लई मेहरवानी केली हाये. या समारंभाचं काम तमाशावाणी लई तरासाचं असतं, पर ववनच्या या थोर मास्तरांनी इक्ते दिवस लई शिताफीनं चालिवलंय. आम्ही तमासगीर गुरु महाराजां म्होरं काय वोलणार ! त्यांच्या हातून साली साल ववन सारखे वहाद्दर पोरं तयार व्हावीत हीच विच्छा." गेन्याला पुढे कांहीं सूचेना तेव्हां म्हणाला, "आपल्या ववनने गांवाचा झेंडा पुण्या मुंवईवर फडकवालाय. गावाला त्यानं लई मोठं केलय. वोला "ववन कुमार झिंदावाद !" गेन्याच्या मागून सभेतून आवाज उठला "ववन कुमार झिंदावाद !" जाग्यावर वसण्यापूर्वी गेन्याने सभेस विनंती केली कीं, 'गुरु दक्षिणा' म्हणून सर्वांनीं टेवलावर फुलना फुलाची पाकळी आणुन ठेवावी. त्याने स्वत: दोन रुपयांची एक नोट गुरुवर्य धोंड यांच्या पुढे ठेऊन ती उडू नय म्हणून त्यावर एक दगड ठेवला. "ही घ्या" "आमची वी घ्या" असे आवाज सभेतून उठले व जो तो व्यासपीठावर जाऊन टेवलावर पैसे ठेवूं लागला. टेवलावर नोटा, नाणी जमा होऊ लागली. गुरुवर्य धोंडांनीं













अनुक्रमणिका

सर्व एकत्र करून नीटनेटकी लाऊन जमा झालेल्या रकमेचा आकडा वारलिग्याच्या कानांत सांगितला. दहा मिनिटांत एकशे अकरा रुपये सदतीस पैसें जमले. गु. धोंडांनीं नाना वेलदाराना विचारलें "ववनचा तपास लागला काय, गोपाळ पाटील कुठं आहेत." नाना वेलदारानीं मानेने नकार दिला व त्यानीं धोंडांना भाषण करण्यास सांगितले. गु. धोंड म्हणाले, "ह्या सत्कारावद्दल मी गावकऱ्यांचा आभारी आहे. ववन येथें नसला तरी त्याला घडविणारा त्याचा शिक्षक मी येथे असल्याने गावकऱ्यांनीं खेद वाळगू नये. ववन तुमचाच आहे. तो केव्हांही येथें येईल. इतर कार्यक्रमामुळें तो कोठें तरी गुंतला असेल एवढंच." त्यानंतर धोंडांनीं स्वतः लोकमान्य टिळकांच्याच गावचे असून कोकणांतली माणसें देशावरील माणसापेक्षा कशी हुषार असतात हें सोदाहरण स्पष्ट केलें शेवटी ते म्हणाले "ववनसाठी मला वर्षभर फारच मेहनत घ्यावी लागली. तो रत्नागिरी कडील कोकणचा विद्यार्थी असता तर मला श्रम कमी पडून तो सर्वच विषयांत पहिला आला असतां. तुमच्या सारख्या अशिक्षित मंडळीनीं शिक्षकाचा गौरव केला यावद्दल मला आनंद वाटला." धोंड गुरुजीच्या भाषणाने गांवकऱ्यांना धक्का बसला. गुरुवर्य वारलिगे यांनी धोंडाना सावरण्यासाठीं व सभेस खूप करण्यासाठी एक वेगळाच मुद्दा आपल्या भाषणांत मांडला ते म्हणाले "तुमचा गांव धन्य आहे. ववनचे आई वडील धन्य आहेत. ववनसारखा तेजस्वी हिरा नांदूरसारख्या छोट्या गांवांत तयार झाला असला तरी त्याचे तेज महाराष्ट्रांत पसरले. तो सर्व विषयांत पहिला आला असता परंतु सगळीकडे राजकारण, वशिलेवाजी माजली आहे. त्याच्यावर अन्याय झाला आहे. असे माझे स्पष्ट मत आहे." वारलिग्यांचे भाषण पूर्ण व्हायच्या आंतच. "सरकारकडे दाद मागा" "अन्याय दूर करा" "मोर्चा न्या" असे एका मागून एक आवाज उठून वातावरण तापूं लागले. धोंडाच्या भाषणाने चिडलेल्या व वारलिग्यांनी सुचविलेल्या नव्या मुद्द्यानें भडकलेल्या सभेतून "अन्याय दूर झाला पाहिजे"च्या घोषणा सुरूं झाल्या. सभेतून धोंडी मुळाणी व्यासपीठाच्या दिशेनें धांवला. त्यानें नाना वेलदाराच्या कानांत कांहीं तरी सांगितले. गु. धोंड व वारलिगे कावरे बावरे झाले व नाना वेलदारास सभा आवरण्याचा आग्रह करूं लागले. तेवढ्यांत कोर्ट दरबार खेळलेला आवा लव्हार टेवलापाशी येऊन म्हणाला "सरकारवर फिर्याद गुदरली पाहिजे. सत्याग्रह केला पाहिजे. तुमी गावचे फुडारी. सत्याग्रहाची येवस्था वघा. मी तालुक्यात जाऊन वकिलाचा सल्ला घेतो." सभेतून आवाज आला "वरोवर हाये"— शाळकरी पोरांनीं 'पहिला नंवर झिंदावाद' 'कुमार ववन झिंदावाद'च्या घोषणा चालूं ठेवल्या. दादा पाटलाने नाना वेलदारास सभा आवरायला सांगितले. म्हातारा वेलदार वोलण्यास उभा राहिला. "समद्यांनीं वसून घ्या. मी काय लई टाइम घ्येनार न्हाई" धोंड गुरुजींच्याकडे वळून नाना म्हणाला "जेच्यासाठी आजची सभा त्या ववनचा पत्त्याच नाहीं यवढी गोष्ट मला लइ लागली हाये. धोंडे मास्तरांनीं काडलेले सव्दंवी असेंच अनखर हायेत. पर शिकलेल्यास्नी आपन आडानी मानसं काय वोलनार ? ही मास्तर मंडळी म्होटी हायेत, पर आमचा पोरगा आम्हांला प्यारा हाये. मास्तरांनीं इक्त्यां पोरास्नी शिकिवलं पर म्होरं आला एकला ववनच. मी वेलदार हाये, पाटा कंच्या दगडाचा घडवायचा अन् मारुती कंच्या दगडाचा घडवायचा हें जसं मला ठावं पाहिजे तसंच मास्तरला वी पोरातला दगड कंचा अन् सोनं कंच हे ठाव पाहिजे. आमचा पोरगा वावन कशी सोनं हाये. हे वी त्याला घडविनाऱ्या गुरु महाराजानीं धेनांत घ्यावं. मास्तरांन म्होरं जराजरा जादा वोलतो म्हणून त्यानी या वेलदाराला माफी करावी पर सत्य आयकावं असी प्रार्थना हाये. ववन विगर सभा घ्यायला मास्तरानीं सांगावं याचं लई वाईट वाटलं मला. आडाणी मानसं आम्ही जास्त वोललो न्हायी इक्तच. दिवसमान वदलले. शिताराम आवाजी मास्तरांनीं याच गावांत पेन्सळ घेतली, देव मानूस तो, ववनला पहिला धडा त्यानं देऊन शेहना केला. त्याच्या देवभोळ्या आई वापांनीं चांगलं वळण लावलं. ती देवमानसं कुनाला ठावं हायेत. त्यांचे फोटू कोन छापील छाप्यांत." गु. धोंड व वारलिगे याना वेलदाराचे घण वसत होते. पण त्यांचा कांहीं इलाज नव्हता. वेलदार भाषण संपवीव्याच्या वेतात होते तोच ववनचे वडील टेवलापाशी आले. नानांनीं भाषण अर्धवट सोडून ववनची चौकशी केली. गोपाळ पाटील म्हणाले "सगळीकडे चौकशी केली पन ववन घावत नाही. मास्तर काय तरी घोटाळा झालाय वघा, ववनची आई मघापासून रडत आहे." धोंड उत्तर देणार तोच. "वऽऽवऽऽऽन अशी किंकाळी फोडीत ववनची आई गऊवाई हंवरडा फोडीत व्यासपीठापाशी आली. "मास्तर, माझा ववन द्याहो" गऊवाई त्या दोघांकडे वघून आक्रोश करूं लागली. सभेत गोंधळ उडाला. सर्व जण व्यासपीठाकडे येऊं लागले "मास्तर ववन कुठाय ?" एक सामुदायिक आवाज आला. एक दगडहि टेवलाकडे आला. दोघाही गुरुजींना दादाभाऊ पाटलांनीं वाजूला नेले. नाना वेलदारांनी ववनच्या आई वडलांनाही वाजूस नेले. लोकांचा घोळका त्यांच्या मागें जाऊ लागला. लोकांना कसे आवरावे हे कोणास कळेना. शेवटीं आवा लव्हार, दादा पाटील, वगैरेनीं असं ठरवलं कीं, संगमपूरला तावडतोव जायचं व ववनचा शोध करायचा. नाना वेलदारांनीं सर्वांना घरोघरी जाण्यास सांगितले. दुपारचे वारा वाजायला आले होते. वेलदाराच्या सूचने वरोबर सारे घरीं परतले. ववनची चुलती गऊवाईना घेऊन मळ्यांत गेली. चावडी शांत झाली. नांदूरगाव अच्यांतासाच्या आंत शांत झालं. रस्ते निर्मनुष्य झाले. मनशा सोनाराच्या दुकानांतील हातोडीचा व वाव्या शिप्यांच्या मशीनचा आवाज कायतो येत होता.

गांवावाहेर पडतांच जीपने वेग वाढवला. जीपमध्यें वसलेल्या सर्वांच्या चेहऱ्यावर काळजीचे ढग जमा झाले होते. धोंड व वारलिगे यांना या सर्व परिस्थितीने मोठेच गोंधळांत टाकले होते. धोंड वाहेर वघत होते. त्यांच्या कानावर कुठून तरी 'गुरुविण अन्य नको वरदान' ही ओळ आल्यासारखे वाटले.

नांदूरची शाळा आज उशीरा भरली होती. कुठल्यातरी वर्गातील सामुदायिक कविता गायन, आसपासच्या शांततेचा भंग करीत होतं. मधून मास्तरांनीं टेवलावर आपटलेल्या छडीचे आवाज येत होते. एक मुलगा हातांत काठी व त्यावर पांढरी टोपी ठेऊन 'पहिला नंवर झिंदावाद ! 'गुरुविण अन्य नको वरदान' असे म्हणत शाळेच्या फाटकापाशी येऊन थांवला. त्याचा सदरा फाटला होता. केस विसकटलेले होते. तोंड धूळीनी भरले होते. पुन्हां पुन्हां तो हात उंच करून काठीवरील पांढरी टोपी शाळेच्या फाटकाच्या दरवाज्यातून वाहेर काढी आणि तोंडाने 'पहिला नंवर झिंदावाद' म्हणे. शाळेची घंटा वाजली, मधली सुट्टी झाली. फाटक उघडल्या वरोवर पोरांचा एक लोंढा फाटका वाहेर उभ्या असलेल्या पोराकडे वळला. पोरांचा घोळका पाहून हातांतली काठी त्यानें उंच केली आणि म्हणाला 'पहिला नंवर झिंदावाद' ! 'कुमार ववन झिंदावाद' ! घोळक्यांतला एक वात्रट पोरगा म्हणाला 'ए वेडया, शाळेत गेलास कां कधी ?' दुसरा म्हणाला 'पळ इथून' तिसऱ्यानें त्याच्या हातांतली काठी व टोपी हिसकाऊन घेतली. सर्व पोरं ओरडली 'वेडा-वेडा, वेडा.' सर्वजण त्याच्या अंगाशी झोंवू लागले. कोणी त्याची फाटकी वाही टरकावली. तो मोठ्याने हसूं लागला. हंसता हंसता तो एकदम म्हणाला 'पहिला नंवर झिंदावाद ! सारी पोरं ओरडली 'पहिला नंवर झिंदावाद' 'कुमार ववन झिंदावाद ! कसला गोंधळ चालला आहे म्हणून पाहाण्यासाठी कुंभार गुरुजी फाटकापाशी आले. त्यांना पाहून सारी पोरं पळून गेलीं. चिंध्या झालेला सदरा व पायजमा घातलेला एक मुलगा मात्र तापलेल्या धुळींत हंसत हंसत 'पहिला नंवर झिंदावाद' असं गुणगुणत वसला होता. कुंभार गुरुजीनीं त्याच्याकडे निरखून पाहिले आणि कपाळावर हात मारून ते ओरडले "ववन !" ●●●






अनुक्रमणिका

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

# गौहत्तीची प्राच्य विद्या परिषद

--ह. सि. उर्सेकर

एम्. ए. एल् एल्. बी.



**तीन हजार वर्षांपूर्वी भारतास लोखंड माहीत होते. गोव्यांत ६।७ व्या शतकांत भोज राजाचे वंशज राज्य करीत होते. कालिदास दोन होते कीं एक होता ?**

**—हे व ह्यासारखे अनेक प्रश्न–उत्तरें ? ....त्यासाठीं हा लेख वाचा.**

**१९६५ मध्यें** प्राच्य विद्या परिषदेचें अधिवेशन गौहत्ती येथें भरणार आहे हें ऐकून माझ्या कुतुहलाचा कुतुबमिनार एकदम उंचावला.

गौहत्तीमध्यें Cattle Trespass Act नसावा. गोकुळाप्रमाणंच तियंही गाई, बैलांचं पशुधन मोकाट रस्त्यावरून हिंडत असावं. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं धिप्पाड अशा गजराजांचा स्वैर संचार चाललेला असावा. आणि बहुतेक आसामी माहूत-विद्या जाणत असावेत असे वाटले. "ऐरावत रत्न थोर, त्यासी अंकुशाचा मार' या ओळींतच ऐकलेला (पाहिलेला नव्हे) "अंकूश" "वॉकिंग-स्टिक"सारखा हातांत वागवीत ते रस्त्यावरून फिरत असावेत. क्वचितच्, एखाद्या गजराजाची आणि त्यांची जुंपत असावी. रस्त्यांतले लोक तो सगळा "समारंभ" बघत अगदी नेहमीच्या सरावाप्रमाणें उभे असावेत..... अशा हस्तिदंती कल्पनांच्या चौकटीत, न पाहिलेल्या पण खूप ऐकलेल्या आसामची रंगीबेरंगी चित्रं हृदयांत ठेवून मी आसामला जायचं ठरवलं.

शिवाय 'आसाम' म्हणजे पूर्वीचे "कामरुप" नांवाचं स्त्री राज्य. तेव्हां गजराजांप्रमाणेंच गजगामिनींचीही "गर्दी" रस्त्या रस्त्यांतून फिरत असेल अशी एक कल्पना !

चेरापुंजी ही जगांतली सर्वांत "ओली जागा." भू-गोलाच्या पुस्तकांत पाठ केलेलं हे ठिकाण गौहत्तीपासून फक्त ६० मैलांच्या टप्प्यांत. तेव्हां तिकडून येणाऱ्या "पायांची ओल" गौहत्तीत ठिबकल्यामुळं या शहराचे रस्ते नेहमीच ओले निदान ओलसर झालेले असावेत. त्यामुळं नुसती गजगामिनीच नव्हे तर "ओलेती गजगामिनी" हे दृश्य गौहत्तींत अगदीं ठोकळेबाज असावे असा आपला मनाचा ठोकताळा झालेला.

इंच इंच लढविण्याचा निर्धार केलेली उंच उंच आसामची उत्तर-सीमा. तेजपूर, नेफा ही ठिकाणं म्हणजे भारताच्या सुपुत्रांनीं रक्ताची शिपणं करून पावित्र्यानं भारून टाकलेली ! त्या परिसरांत जायची "स्टेन"लेस संधी मी कशी दवडेन ? (संधीलाही सुवर्णाचा स्पर्श घडवण्याचा संधीसाधूपणा आपल्याला कांहीं जमत नाही.) जावे लागणार होते.

मुंबई ते गौहत्ती ! केवढा लांबलचक प्रवास ! बहुतेक सगळाच प्रवास रेल्वेनं. रेल्वे प्रवासाला निघण्यापूर्वी "जागेचं आरक्षण" वगैरे आन्हिक आटपायलाच हल्ली प्रवासापेक्षांही अधिक वेळ लागतो. "क्यू"मुळे जशी शारीरिक शिस्त आपल्या अंगांत भिनली त्याच प्रमाणें वीस दिवस आधीं जागेचें "आरक्षण" करायचं वळण प्रवाशांच्या मनोव्यापाऱ्यांना अगदी नकळत पडलं आहे. प्रवासाबद्दलचे मनोव्यापारहि आतां योजनापूर्वक होऊं लागले आहेत.

ठरल्याप्रमाणें आम्ही बोरीबंदरवर जमलों. कांहीं संस्कृत प्राध्यापकांच्या वेदाभ्यासतरल सहवासात आणि चर्चायुक्त गप्पाष्टकांत दोन दिवस कसे गेले ते कळलं सुद्धां नाहीं आणि तिसऱ्या दिवशीं पहाटे आम्हीं कानपूरला पोहोचलों.

अवधतिरहून मेलच्या प्रवासाचें 'आरक्षण' केलेलं होतं ती गाडी गाठायची म्हणजे कानपूर ते लखनौ हा ४५ मैलाचा टप्पा एक तासाच्या आंत काटणे आवश्यकच होते. म्हणूनच आम्हीं टॅक्सीनं ते अंतर तोडायचं ठरवलं.

उत्तर भारतामध्यें स्वच्छ व सरळ अशा आस्फॉल्टच्या रस्त्यावरून, हिवाळ्याच्या दिवसांत धुक्याची ओढणी घेऊन आमची मोटार धांवत होती. सुसाट–बेबंद धांवणाऱ्या मोटारीचा आमचा प्रवास केवळ अविस्मरणीय होता.

"राघो भरारी"च्या हिरीरीनें आम्ही लखनौ गाठलं खरं पण अक्षरशः गड आला पण सिंह गेला हा ऐतिहासिक धडा आम्हाला पुन्हा एकदां प्रत्ययाला आला.

लखनौ आलं... पण गाडी गेली ! थेट गाडी चुकली आणि वेळगाडी आमच्या वांट्यास आली.

जो प्याल्यानें थंडीत उष्णता व उन्हाळ्यांत थंड वाटतें (हा गुण











अनुक्रमणिका



सवारी !

एक होती कुंवारी
तिला आवडे गवारी
लग्नानंतर सासरी
कोण तिला विचारी ?
(कारण) गवारीशी ज्याचं वाकडं—
अशी मिळाली सवारी !

—यशवंत देव

'शामा' नायिकेचे ठिकाणीं असतो असें संस्कृत सांगते) अशा चहाच्या मळ्यांत वेठीनें काम करायला जाणाऱ्या हजारों बिहारी मजुरांचा गराडा आमच्या गाडीभोंवतीं पडला. पहिल्या वर्गाच्या, आमचे डव्यांत शिरण्यासाठीं शिव्या, दगड, धक्के वगैरे शस्त्रें त्यांनी वापरली. कटीहारजवळ तर आमचे डव्यास वेढा घातलेल्या किल्ल्याचें स्वरूप आले. दाराची कांच दगडानें फुटली, दाराचा एक कोयंडा पडला, फुटवोर्डावरून चालत्या गाडींत आमच्यावर हल्ला होत होता. डव्यांतील दिवे वंद करून आम्ही झगडत होतों. लढाईतील Black outचे महत्व आम्हांला सप्रयोग कळले ! कांहींना अयर्वशीर्ष आठवले कारण आमचे शीर्ष जाग्यावर राहील की नाहीं याची शंका निर्माण झाली ! पुढचे स्टेशन आले आणि हल्लेखोर परत गेले. जिवावरचे हें संकट 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' ह्या वर्णनावरहुकुम झालें कारण दिवसा सुरू झालेला हल्ला रात्रीं संपला ! आणि ही चिरस्मरणीय रात्र वस्तुतः आमचीच अखेरची रात्र ठरायची ती फक्त १९६४ सालचीच अखेरची रात्र ठरली कारण तो दिवस ३१-१२-६४ होता !

आमचा देह जगला पण वर्षानें देह ठेवला !

पांचव्या रात्रीं २७०० किलोमीटर (कां लिटर) एवढा प्रवास आटपून गौहत्तीस पोंचलो. वाटेंत गंगा, महानदी, कोसी वगैरे नद्या पार केल्या. सिलीगुडी नंतर रेल्वेलायनीचे परिसरांत चहाचे मळे दिसले. चहाची छोटी छोटी झाडें हारीनें लावली होती. त्याचेमध्ये कुठेंकुठें राईच्या झाडांची पिवळी फुलें डौलानें डोलत होती. चहाला मोहरीची फोडणी घालणारी निसर्ग सुंदरी आम्हांस नागरी नववधूप्रमाणें भासली !

आसाम ही चहाची जन्मभूमी ! ह्या प्रदेशास प्राचीन काळीं प्राग् ज्योतिष म्हणजे पूर्वेकडचा डोंगराळ मार्ग म्हणत. महाराष्ट्रांतील सह्याद्रीच्या पुरातन वैभवाचे वर्णन ब्रह्मपुराणांत आढळते तसें प्राग् ज्योतिषाचे वर्णन कालिकापुराणांत वाचायला मिळतें. इ. स. पूर्व ५ व्या शतकांत किंवा तत्पूर्वीही ब्रह्मपुत्रा नदीनें विभागलेले प्राग् ज्योतिषाचे उत्तर व दक्षिण असें दोन भाग होते. उत्तर भागास कामरुप म्हणत व प्रागज्योतिषपुर (आजचे गौहत्ती) ही त्याची राजधानी होती आणि दक्षिणेस आसाम म्हणजेच पाणिनीनें सांगितलेले सुरमसा जनपद. महाभारतांत भगदत्त हा प्रागज्योतिषांचा राना म्लेंच्छ व यवन प्रजेवर राज्य करीत असे असें, वर्णन आहे. भगदत्तानें युधिष्ठिराला चपळ घोडे, रत्नांची भांडीं, हस्तीदंती मुठीच्या तलवारी नजर केल्या. कालिदासानें रघुवंशांत रघुदिग्विजयांत प्रागज्योतिषाचा उल्लेख केला आहे. हर्षचरितांत वाणानें राजा भास्करवर्म्यानें श्रीहर्षराजांस दिलेल्या नजराण्याचे वर्णनावरून आसामचे प्राचीन वैभवाची कल्पना येते.

असाम म्हणजे अ-सम. नतोन्नत भू प्रदेश. ब्रह्मपुत्रा ही आसामची नाईल. चहा, इमारती लाकुड प्रसिद्ध आहे. आसामची भाषा वंगालीला जवळची. लोक सज्जन, चोरी क्वचित. आम्हीं उतरलेल्या होस्टेलमध्यें एकदांही कुलुप लावलें नाहीं. आतिथ्यशील माणसें मंगोलिअन व आर्यन मिश्र वंशाची. भारताच्या वायव्य सीमेवर उंच धिप्पाड लढाईखोर गौरवर्णीय माणसें तर आग्नेय सरहद्दीवरील प्रजा वारीकशी, शामवर्णीय व शांत स्वभावी !

गौहत्ती हे कांही आसामचे पाटनगर नव्हे. शिलाँग ही राजधानी. गौहाटी म्हणजे गुवा हाटी म्हणजे सुपारी वाग. येथें कोंकणाप्रमाणें सुपारीच्या वागा खूप आहेत. कांहीं लोक तर रोज डझन सुपाऱ्या सहज खातात असे ऐकलें. पण मला सुपारीच्या खांडाचे व्यसन नसल्यानें मी तिची चव घेतली नाही ! गौ हाटी म्हणजे गुरांचा वाजार अशीहि या नगराच्या नांवाची व्युत्पत्ति ऐकली. पण ती खरी नव्हे. गौहत्ती हे सुमारें दीड दोन लाख वस्तीचे शहर ब्रह्मपुत्रेच्या पूर्व किनाऱ्यावर हिरव्यागार टेकड्यांचे पार्श्वभूमीवर आराम करीत आहे. थंडी फार नव्हती. ब्रह्मपुत्रेच्या सुमारें मैलभर रुंदीच्या अथांग पात्रांत तीन बेटें आहेत. आम्हीं त्यांचे नांव तिवेट ठेवले.

ब्रह्मपुत्रेवरील दोन मजली प्रचंड पूल प्रेक्षणीय आहे. पूर्वी तेथें सराईघाटची लढाई झाली. पुलाच्या वरच्या मजल्यावरून मोटारी व पादचारी ह्यांची रहदारी आहे तर खालच्या मजल्यावरून रेल्वे जाते. अलाहावादला गंगेवर असाच सेतु आहे पण ह्यांत रेल्वेवर आहे व रस्ता पहिल्या मजल्यावर आहे ह्या उलट कानपूर वर दोन स्वतंत्र समोरासमोर पूल गंगेवर बांधले आहेत. कुस्तीचे खेळांत वर खाली किंवा बरोबरी होते तसेंच कांहींसे हे तीन प्रकार पाहून माझ्या एका मल्ल मित्रास वाटलें.

गौहाटीला प्राच्य विद्या परिषदेचे संचालकांनी फार सोईस्कर आंखणी केली होती. रेल्वे स्टेशनापासून दोन फर्लांगावर प्रतिनिधि निवासस्थानें. पुढें फर्लांगावर सत्र वाचनालयाचे सभागृहांत अधिवेशनाची जागा. स्नान भोजनाची योजना उत्कृष्ट होती. मदतीला "May I help You" चे हास्य तोंडावर असलेले स्वयंसेवक.

२ जानेवारी १९६५ ला परिषदेचे अध्यक्ष माननीय डॉ. आगरवाल यांचे अध्यक्षतेखालीं प्राच्य विद्या परिषदेच्या २२ व्या अधिवेशनाचे उद्घाटन सत्र वाचनालयाचे भव्य सभागृहांत आसाम व नागप्रदेशाचे राज्यपाल श्री. विष्णुसहाय यांनी केले. सभागृह अनलंकृत होते. अखिल भारतांतील विद्यालंकार तेथें जमल्यानें इतर शोभादायक वस्तूंची गरजच काय !

प्रदीर्घ ॐकारानें अधिवेशनाला सुरुवात झाली. आचार्य देवराज यांनीं वैदिक मंत्रोच्चार केला नंतर घनगंभीर असें शंखवादन झाले. शंख हे वाद्यच असें आहे कीं, कुरुक्षेत्रावरील रणभूमी असो नाहींतर शारदेचे मयूर सिंहासन असो शंखनाद हेच आर्यांचे आवाहन साधन

अनुक्रमणिका

आहे. यानंतर भरतानें नाटचशास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीच्या कुतपानें किंवा संगीत वृंदानें गायन केले व अधिवेशन सुरू झालें.

श्रीनगर येथील १९६१ चे अधिवेशना नंतर पंडित राहूल सांकृत्यायन, डॉ रघुवीर, सरदार पणिक्कर, पंतजलीशास्त्री वगैरे विद्वान रत्नें हरवली गेली त्यांचे पुण्यस्मरण करण्यांत आले. आसामचे मुख्यमंत्री श्री. छलिया यांचे स्वागत प्रवचनानंतर राज्यपालांनीं फर्ड्या इंग्रजींत मार्मिक भाषण केले. अर्जुनाला मणिपुरांत उलुपि मिळाली पण तुम्हांला मिळेलच असें नाहीं, कारण नागकन्या शरसाध्य असते, शापसाध्य नाहीं ! अध्यक्ष डॉ. वासुदेव शरण आगरवाल यांनी छापील भाषण न वाचतां ते उत्स्फूर्त बोलले. मूर्ति छोटी पण विद्वत्ता मोठी. बनारस हिंदु विद्यापीठांत ते कला व शिल्प विभागाचे प्रमुख आहेत. "पाणिनीच्या काळांतील भारतवर्ष" वगैरे ह्यांचे संशोधन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. भारतीय संस्कृतीचे भव्य व दिव्य चित्र त्यानीं आपल्या समर्थ शब्दांनीं रंगविले. वैदिक आर्यांनी भूगोल, खगोल, तत्वज्ञान यांचा विचार केला. ब्रह्मसूर्यसमं ज्योतिः । यजुर्वेदांत म्हटले आहे कीं ब्रह्म म्हणजे सूर्यासारखी ज्योति आहे. संस्कृत ही भारतीय संस्कृतीची सनातन भाषा आहे व तिची उच्च पातळी शिक्षणांत ठेवलीच पाहिजे व त्यासाठीं प्राचीन गुरु शिष्य परंपरेचे पुनरुज्जीवन केले पाहिजे हा त्यांच्या भाषणाचा गाभा !

या अधिवेशनांत वैदिक व संस्कृत वगैरे विभागांच्या विभागीय अध्यक्षांची भाषणें झाली. पुरातन विभागाचे अध्यक्ष बडोद्याचे डॉ. सुब्रह्मण्यम् यांनी अध्यक्षीय भाषणांत राजस्थानमध्यें कलिबँगन येथें नुकत्याच उजेडांत आलेल्या उत्खननाचा उल्लेख करून सांगितले कीं यामुळें हसप्पा प्रधान सिंधु खोऱ्यांतील संस्कृतीचे राजस्थानांतील मूळ निश्चित करण्यास उपयोग होईल. उत्तर प्रदेशांतील अतरंजीखेरा येथील उत्खननांत आढळलेल्या लोखंडाला कार्बन १४ कसोटी लावून भारतांत सुमारें ३००० वर्षांपूर्वी लोखंड माहित होतें असें सिद्ध होतें. पुगवरम् येथें सांपडलेल्या मुधोळ पटांवरून गोव्यांत ६ व्या ७ व्या शतकांत भोज राजाचा वंश राज्य करीत होता असें दिसते.

भारतीय पुरातत्त्व विभागाचे अध्यक्ष डॉ. घोष यांनी नाणी परिषदेचे पुढें केलेल्या अध्यक्षीय भाषणांत सांगितलें कीं, भारतांत नाणी पाडण्याची कला सुमारें २६०० वर्षांपूर्वीपासून माहित असावी.

इतिहास विभागाचे अध्यक्ष मद्रास विद्यापीठांतील डॉ. महालिंगम् यांनी आपल्या भाषणांत सांगितले कीं, भारताचा इतिहासकाल सुमारें ४००० वर्षांपूर्वी सुरू होतो. हें खरें पण मोहेंजोदारो व मौर्य राजवट या कालखंडामधील इतिहास अजून काळाच्या अंधेरी उदरांत दडपलेला आहे. भारताच्या इतिहासाचे सम्यग् दर्शन होण्यासाठीं मध्य व आग्नेय आशिया, मध्यपूर्व व ईजिप्त इत्यादि देशांच्या प्राचीन इतिहासाचा अभ्यास झाला पाहिजे. तसेंच मौलिक ऐतिहासिक साधनांच्या अभ्यासासाठीं पर्शिअन, फ्रेंच, डच वगैरे परभाषांच्या ज्ञानाची आवश्यकता इतिहास संशोधकाला आहे.

प्राच्य विद्या परिषदेचे काम १६ विभागांत वाटले होते. प्रत्येक विभागास स्वतंत्र अध्यक्ष होते. सुमारें ७०० ते ८०० प्रतिनिधि आले होते. शेंकडों संशोधनात्मक निबंध वाचले गेले. त्यांत कालिदास एक नसून दोन होते—एक कवी व दुसरा नाटककार असें एका पंडितानीं प्रतिपादिले यावर आम्हांस ज्ञानेश्वराच्या दोन आवृत्यांची आठवण झाली. इतिहास कालखंडांतील १७ हर्षराजांपैकीं ७ व्या शतकांत स्थानविश्वट येथील श्री हर्ष राजा हाच रत्नावली नाटकांचा लेखक श्री हर्ष होय. रामायण इ. स. पूर्व सहाव्या शतकांतील किंवा इ. स. पूर्व ३ ऱ्या शतकांतील संस्कृत नाटकांतील संगीताचे स्थान, संस्कृतांतील आद्य नाटककार अश्व घोष की भास वगैरे विषयांवर मार्मिक विद्वत्तापूर्ण चर्चा झाली. एका पंडितानें गीतेच्या पर्शियन भाषांतराबद्दल निबंध वाचला, तर दुसऱ्यानें उर्दू कविराज मिर्झा गालिब यानें आपले वय ७ वर्षांनीं चोरले होते असें दाखवून कवी व चोर यामध्यें वाङमय चौर्याशिवाय आणखी एक साधर्म्य दाखवून दिले.

प्रतिनिधींच्या करमणुकीसाठीं चालकांनीं आसामी कविश्रेष्ठ शंकरदेव (१५ वे व १६ वे शतक) यांचे रुक्मिणीहरण हे नृत्यनाट्य दाखवलें. हे कविवर्य १२० वर्षे जगले. भारताच्या नाटचशास्त्रांतील नियमाप्रमाणें हा प्रयोग झाला. कृष्ण इतका रेखीव होता कीं अजिंठ्यातून थेट उचलून आणलेला असावा असें वाटले.

गौहत्तीजवळील कामाख्या देवीचें मंदिर फार प्रेक्षणीय आहे. कामाख्या म्हणजे उमासंहारांतील एका अवशेषाचे मंदीर. सुमारे २० मैलावर हयग्रीव माधवाचे मंदीर आहे त्या समोरील गर्द नारळींना वेष्टिलेल्या तलावामुळें केरळीय सौंदर्याची स्मृति जागृत होते.

गौहत्तीचे प्राच्य विद्यापरिषदेचे अधिवेशन उत्कृष्ट झाले. अगत्यपूर्ण आतिथ्य, ब्रह्मपुत्रेचे विशाल गांभीर्य आणि १० दिवस प्रवास व तीन दिवस वास (गौहत्तींत) या गोष्टींमुळें माझे स्मृतींत ठसले आहे.

परिषदेचें पुढील अधिवेशन १९६६ मध्यें अलिगड येथें भरविण्यांत येणार आहे. ●●●



**माफ करा हं ! मला तुमच्या केसमध्यें कांही एक करतां येणार नाहीं. तुम्ही दांताच्या डॉक्टरलाच तुमची प्रकृति दाखवा !**



अनुक्रमणिका

वृत्त–व्यवसायाच्या
जिव्हाळ्याचा प्रश्न

# उमलत्या अर्थव्यवस्थेंत जाहिरातीचें स्थान

मयूर

**मार्च** महिन्याच्या, शेवटच्या आठवड्यांत भारत सरकारच्या अर्थ खात्यानें जाहिरातींवर होणाऱ्या खर्चांत कर आकारतांना द्यावयाच्या सुटीचें 'स्पष्टीकरण' करणारा एक फतवा उतावळेपणानी काढला आणि प्रक्षुब्ध लोकमतामुळे घाईघाईनें परत घेतला. नियम अंमलांत आले असते तर व्यापारी कंपन्यांच्या जाहीरातीवर होणाऱ्या खर्चावर एकूण उत्पादनाच्या १% इतकी मर्यादा आली असती. म्हणजेच एखाद्या कंपनीची एकूण वार्षिक उलाढाल (Turn-over) एक कोटी रुपयाची असल्यास तिनें जाहीरातींवर फक्त एक लाख रुपयेच खर्च करावयाचे. तितकीच रक्कम करमुक्त म्हणून त्या वर्षीच्या एकूण नफ्यांतून वजा करतां येईल. यांहून अधिक रक्कम खर्च केल्यास त्यावर जबर कर भरावा लागेल. जाहीरातीवरील खर्चावर असे निर्बंध जाहीर झाल्याने तात्काळ दोन मूलभूत प्रश्न उपस्थित झाले. त्यांतील पहिला असा कीं, सार्वजनिक क्षेत्र व खाजगी क्षेत्र यांचें सहजीवन मान्य केलेल्या व दोहोंस निःपक्षपाती वर्तणूक देण्याचें विरुद मिरविणाऱ्या लोकशाही सरकारने खाजगी क्षेत्राची बाजारपेठेंत कुचंबणा करणारे नियम अंमलांत आणणे कितपत समर्थनीय ठरेल? आणि दुसरा प्रश्न हा कीं उमलत्या (Developing) अर्थव्यवस्थेंत आधुनिक तंत्र-मंत्रांनी युक्त अशा जाहीरातबाजीस खरोखरच कांहीं स्थान आहे काय?

जाहिरातीच्या नियमांचें स्पष्टीकरण करणारे 'राजपत्र' (Gazette) सरकारने तूर्त मागे घेतलें असल्यानें तें पुन्हां बदललेल्या स्वरूपांत दाखल होईतों पहिल्या प्रश्नावर भाष्य करणें उचीत होणार नाहीं. पण उमलत्या अर्थ–व्यवस्थेंतील जाहिरातींच्या कार्यासंबंधीं मात्र कांहीं किंतु मनांत राहण्याचा–अथवा विचारांची गल्लत होण्याचा धोका असल्यानें हीच चर्चा आपणास प्रथम करावी लागेल.

## बापुडवाणा बादशहा

जाहिरातींवर होणार एक जुनाट आरोप असा आहे की भरभराटलेल्या अर्थ-व्यवस्थेसच जाहिरातबाजीचे चोजले परवडतात. कारण तेथें एकाच वस्तूंचे अनेक उत्पादक असल्यानें त्यांच्यात आपला माल खपावा म्हणून स्पर्धा लागते. बाजारांत ग्राहक हाच बादशहा असल्यानें त्या नियंत्याला नमन करून खुष ठेवल्याशिवाय उत्पादकांचें निभतच नाहीं. याउलट उमलती अर्थव्यवस्था तुटवड्याची असून तिच्या तोंडीं नन्नाचा पाढा असतो. त्यामुळें ग्राहक अगतिक बनतें व मिळेल तें मिळेल त्या किंमतींत वखोटीस मारून ग्राहक घरचा रस्ता धरतें. मग कशाला हा जाहिरातबाजीचा षौक आणि कशाला हवा त्यासाठीं खर्च? पण ग्राहकाच्या असहाय्यतेसंबंधी वरवर बिनतोड वाटणारें हें विधान अनुभवाच्या कसोटीला उतरत नाहीं.

## असाच प्रारंभ

पूर्वीच्या नाटकांतून एक ट्रान्स्फर सीन म्हणून प्रकार असे. नाटक सुरू असतांच एक मोठा आवाज करायचा. त्यायोगें भांबावून प्रेक्षकांचें चित्त रंगभूमीवरून क्षणभर विचलित होतांच तेवढ्यांत चतुराईनें रंगमंचावरील दृश्य पार बदलून टाकावयाचें. पण अर्थव्यवस्था म्हणजे रंगमंच नव्हे. एका रात्रींतून एखादी अर्थव्यवस्था भरभराटीस पोंचल्याचें उदाहरण संभवनीय नाहीं. कळीचें क्रमाक्रमानें पूर्ण पुष्प हीच विकासाची प्रक्रिया प्रत्येक अर्थव्यवस्थेच्या बाबतींत अनुभवास येते. तुटवड्यातून विपुलत्वाकडे अशीच अर्थव्यवस्थेची वाटचाल असते त्यामुळें जाहिरातबाजी ही भरभराटीच्या अर्थव्यवस्थेस परवडणारी चैन आहे हें विधान अज्ञान अथवा अंतरीचा आगळा हेतू दर्शवितें.

## सनातन वारसा

कारण जेव्हा आपण एखाद्या अर्थव्यवस्थेच्या विकासाचा मागोवा घेवूं लागतो तेव्हां हेंच आढळतें की जाहिरातीच्या तंत्रानें तिच्या उत्कर्षास मोठाच हातभार लावला आणि त्याचबरोबर स्वतःचीही चांगली प्रगती साधली. हें करीत असताना जाहिरातींचे तंत्र उमलत्या अर्थव्यवस्थेंत त्रिविध कामगिरी बजावीत असतें. पहिलें, उत्पादनांतील नवीन वस्तूंची ग्राहकांना माहिती देणें; दुसरें, त्यांच्या उपयोगाविषयीं लोकांस शिक्षण देणें आणि तिसरें लोकांच्या जीवनांत उपलब्ध असलेल्या वस्तूंविषयीं त्यांच्यांत अपूर्णतेची व असमाधानाची भावना निर्माण करून त्यांना अधिक उपयुक्त अशा सुखसोयींनी पूर्ण असलेलें वरचढ जीवनमान गांठण्यासाठीं प्रेरणा देणें. अशा प्रेरणांतून जी कार्यप्रवणता निर्माण होते ती अर्थातच उत्पादनांतील अखंड प्रगतीची ग्वाही ठरते.





अनुक्रमणिका

तसं पाहिलं तर जाहिरातीमध्यें नवीन असं कांहींच नाही. ती माणसाच्या रक्तांत मुरली असून वारसा रूपानेंच पूर्वसुरींपासून आजतागायत चालत आलेली आहे. एकच उदाहरण द्यावयाचें झाल्यास पूर्वीच्या खेडयांतील दवंडीवाला हा जाहिरातदारच नव्हता काय ? युरोपांतील औद्योगिक क्रांतिनंतर फरक पडला असेल तर तो इतकाच की दवंडीवाल्याची जागा हळुहळु वर्तमान पत्र, नभोवाणी, प्रचंड फलक (Hoardings) वगैरे मान्यवर व मातब्बर माध्यमांनी पटकाविली व एवढ्यांत दूरचित्रवाणीनें त्यावर कळस चढविला.

## असंतोषाची जननी

प्रस्थापित मोठाल्या बाजारपेठा सुसूत्र करण्याचा आणि छोट्या पेठा मोठ्या बनविण्याचा जाहिरातींचा एक खास मार्ग आहे आणि त्याचें माध्यम आहे असंतोष ! बाजारपेठेंत नव्याने येणाऱ्या कुठल्याहि वस्तूची माहिती जाहिरातीद्वारा लोकांना दिली जावून तिच्या उपयोगाचें शिक्षणही दिलें जातें. त्या वस्तूचा लोकांमध्यें कांही प्रमाणांत प्रसार होतो न होतो तोंच जाहिरात त्याहून उजव्या अशा वस्तूची ओळख लोकांना करून देते. त्यामुळें लोकांना आपल्या जवळील वस्तू जुनी वाटूं लागते व नवीचें आकर्षण निर्माण होते. ह्यांतूनच नवी वस्तू घेण्यासाठीं लागणारें जास्तीचें द्रव्य मिळविण्याची धडपड सुरू होते. अंग मोडून मेहनत करण्याची प्रेरणा ती हीच. भौतिकवादी दृष्टीकोणच सगळ्या आर्थिक घालमेलींचा पाया असल्याने यांत वावगें असें कांहींच नाही. किंबहुना, आर्थिक नियोजनाचा मूळ हेतूच कमीतकमी वेळांत अधिकांश प्रगती साधणें हा आहे.

## विधात्याशींच स्पर्धा

योजनापूर्वक जोपासलेला असंतोष कुठला चमत्कार घडवूं शकतो त्याचें एकच उदाहरण पहाण्यासारखें आहे. पूर्वीच्या काळीं वर्फ लाकडाच्या भुशामध्यें दडपून ठेवीत. परंतु कांही तासांतच तो मालकाच्या हातावर तुरी देवून आणि मागे दमट भुसा ठेवून निघून जाई. त्यावर उपाय म्हणून वर्फाची पेटी निघाली व जाहीरातींनी तिचें गुणगान करून मागणीचा ओघ ओढून घेतला. तथापि वर्फ सांठविण्याच्या प्रश्नावर अद्याप समाधानकारक तोडगा सांपडला नव्हता व या असंतोषांतून जन्म झाला रिफ्रीजीरेटरचा. 'शीत संग्रहाच्या' (Cold Storage) क्रांतिकारी शोधाबरोबर एका रात्रींतून भाज्या, अंडीं, दुभतें, फळें वगैरे नाशीवंत वस्तूंचें आयुष्य आश्चर्यकारकरीत्या वाढलें. ही एक प्रकारें विधात्याशींच स्पर्धा नव्हे काय ? व ह्या यशांतील जाहिरातीचा सिंहाचा वाटा कोण बरें नाकारूं शकेल ?

उमलती अर्थव्यवस्था सगळी एकदमच उन्नत होत नाही. प्रगतीची प्रक्रिया प्रथम ग्राहकाच्या दैनंदिन गरजांच्या क्षेत्रांत एकमेकाशीं स्पर्धा करणारे उत्पादक आखाडयांत उतरण्यांत होते व त्या त्या क्षेत्रांत ग्राहकास किंमत व पसंती असें दुहेरी स्वातंत्र्य मिळूं लागतें. आपल्या येथें वनस्पती, साबण, सौंदर्यप्रसाधनें, विजेचीं नित्याच्या वापरांतील उपकरणें अशीं कांहीं स्पर्धेची क्षेत्रें आहेत. त्यांत उत्पादनाचा दर्जा उंचाविण्याची जिद्द व ते ग्राहकांना पेश करण्यासाठीं जाहिरात अशी ही एकूण यंत्रणा आहे.

## उधळपट्टी ?

तथापि कुठलाहि उत्पादक निव्वळ ग्राहकाच्याच सोयीसाठीं सारखा तळमळत असणें शक्य नाही. तसें झाल्यास त्याची हां हां म्हणता बाजारपेठेंतून हकालपट्टी होईल. मग प्रश्न उरतो तो हा की उत्पादक जर जाहिरातीवर होणारा खर्चही ग्राहकाकडूनच वसूल करणार असेल तर त्यामुळे तयार मालाच्या किंमती किती वाढतील ? तसेंच वारेमाप स्पर्धेच्या अभिनिवेशानें जर जाहिरातींवर अफाट पैसा खर्च झाला तर त्याचा संपूर्ण अर्थव्यवस्थेवर कसा ताण पडेल ? आणि ही उधळपट्टी करमुक्त ठेवून काय म्हणून जोपासावयाची ? ह्या प्रश्नांची उत्तरें अचुक मिळण्यासाठीं आपल्याला भारतामध्यें जाहिरातींवर खर्च होणाऱ्या पैशाची प्रथम शहानिशा करावी लागेल.

सोबत जोडलेल्या तक्त्यावरून असें आढळून येईल की आपल्या येथें जाहिरातींवर होणारा खर्च इतर देशांतून या खात्यावर होणाऱ्या खर्चाहून कितीतरी कमी आहे. तक्त्यांतील आकडे १९६३ चे असले तरी गेल्या दोन वर्षांत त्यांच्या 'प्रवृत्तींत' (Pattern) विशेष बदल घडलेला नाही. आतां क्षणभर असा विचार केला की सांप्रतची तुटपुंजी रक्कमदेखील जाहिरातींवर खर्च करायचें आपण थांबविलें तर ग्राहकाला वस्तू आजच्यापेक्षा कमी किंमतीमध्यें मिळूं शकतील का ? प्रत्यक्षांत याच्या नेमकें उलटें घडेल. कारण हल्लीं उत्पादनाचीं जीं जगड्व्याळ यंत्रें आहेत त्यांच्यासमवेतच 'उत्पादनाचा आलेख' (Chart) जोडलेला असून तेवढ्या उत्पादनासाठीं येणाऱ्या खर्चाचा बराच मोठा भाग स्थिर स्वरूपाचा असतो. व प्रत्यक्ष उत्पादन यंत्राच्या उत्पादनक्षमतेहून बरेंच कमी झालें तरी अशा स्थिर खर्चांना फारशी कात्री लावतां येत नाहीं. ह्याचाच अर्थ असा की ५०००० वस्तूंची उत्पादन पात्रता असलेलें यंत्र वसविलेल्या कारखानदाराची विक्री जर जाहिरात थांबविल्याने २५००० वस्तूंपर्यंत घसरली तर त्याचे स्थिर खर्च हे ५०००० वस्तूं ऐवजीं २५००० वस्तूंवर विभागले जातील व ग्राहकाच्या हातांत ती वस्तू वाढलेल्या किंमतींत पडेल.

वरें, जाहिरात न करतां ५०००० वस्तू विकण्याचा आग्रह धरल्यास विक्रेत्यांच्या संख्येंत एकदम फार मोठी वाढ करावी लागेल व त्यांचे प्रवास, भत्ते, पगार वगैरे खर्चाचा जास्तीचा बोजा ह्या ५०००० वस्तूंवर पडून ग्राहकाला पुन्हा वाढीव किंमत द्यावी लागेल.

## सोनें तीन रुपये तोळा !

जाहिरातबाजीवर होणारा आणखी एक सरधोपट आरोप असा की जाहिराती नको असलेला निकृष्ट माल ग्राहकाच्या पदरीं बांधतात. पण हा आरोप अनुभवाच्या निकषास उतरत नाही. "अमृतसरांत सोनें तीन रुपये तोळा" ही जाहिरात प्रत्येकानें अनेकदा वाचली आहे. आपल्यांतील किती पुरुषांनीं त्या सोन्याच्या अंगठ्या बोटांत घातल्या आहेत अथवा स्त्रियांनी त्याचीं बाहुभूषणें घडविलीं आहेत ? अगदीं ताजें उदाहरण द्यावयाचें झाल्यास गेलीं

कांहीं वर्षे भरमसाट जाहिरात चाललेल्या एका टुथपेस्टचे देतां येईल. तीवर जाहिरातीपायीं खर्च होणाऱ्या रकमेचे आकडे फुगताहेत आणि पेस्टच्या विक्रीचे आकडे रोडावताहेत. सारांश, निव्वळ जाहिरातीच्या जोरावर ग्राहकाची दीर्घकाळ फसवणूक होऊं शकते ह्या कल्पनेंत सत्यापेक्षां भ्रमाचाच भाग अधिक आहे. अमेरिकेंतील हन्ट फुडस् नांवाच्या कंपनींतील एका वडया अधिकाऱ्याने या बाबतींत नुकतेच काढलेले उद्गार मोठे मनोरंजक व मननीय आहेत. तो म्हणाला, "बेकार वस्तूची बाजारांतून ताबडतोब उचलबांगडी करण्याचा मार्ग एकच. अतिशय आक्रमकतेने तिची भरमसाट जाहिरात करणें."

## दोन ध्रुव ? छे

इथवर केलेल्या विवेचनावरून हें सहज ध्यानांत येईल की आर्थिक नियोजन व जाहिराती यांत ध्येयाची विभिन्नता नाही. तर समानता आहे. दिल्लींत भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनांत भाषण करताना २–१–१९५६ रोजीं राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् म्हणाले होते, "उमलत्या अर्थव्यवस्थेचें ध्येयच मुळी हें आहे कीं भुकेल्यांच्या तोंडी घांस भरवावा, वस्त्रहीनांना आवृत करावें, ऋग्णांची शुश्रुषा करावी आणि एकंदरींतच लोकांचीं मनें सुसंस्कृत करावी." या ध्येयाच्या ध्रुव ताऱ्याच्या रोखाने उमलती अर्थव्यवस्था निघाली की तिची ध्वजनौका बनते जाहिरात.

## उमलत्या अर्थव्यवस्थेंत जाहिरातीचें स्थान

### तक्ता

| अनुक्रम | देशाचे नांव | जाहिरातीवरील एकूण खर्च (१९६३–रुपये / कोटी) | जाहिरातीवरील दर डोई खर्च | जाहिरातीवरील खर्चाचें राष्ट्रीय उत्पन्नाशीं प्रमाण |
|---|---|---|---|---|
| १) | अमेरिका | ६१३० | रू. ३२० | २.७% |
| २) | इंग्लंड | ६६० | ११८ | २.१% |
| ३) | पश्चिम जर्मनी | ५७० | १०० | १.६% |
| ४) | जपान | ३९० | ३८ | १.३% |
| ५) | भारत | २९.७ | ०.७० | ०.२५% |




# उटकमंडमध्यें सिंहच सिंह!

**मला** सिंह भेटले! अहो, खरोखर सिंह भेटले! नाहीं ना विश्वास बसत? नाहींच बसायचा! माणसाला सिंह भेटला आणि तो मला भेटला हें सांगायला तो माणूस जिवंत आहे. चालतो आहे! बोलतो आहे हें विश्वासार्ह वाटणारच नाहीं. पण माणसांप्रमाणें सिंहांच्याही अलिकडे वेगवेगळ्या जाति झाल्या आहेत. रानावनांत हिंडून श्वापदें मारून वनराज म्हणून मिरविणाऱ्या सिंहांची एक जात आणि माणसांच्या कळपांत राहून, माणसांची सेवा करणारे, नव्या समाजाच्या, सुस्थिर समाजाच्या उभारणीसाठीं आपला 'सिंहाचा' वांटा उचलणाऱ्या सिंहांची जात वेगळीच! आतां तुम्ही सांगा कीं उटकमंडला माणसें कशासाठीं जातात? सोपें उत्तर! चटकन् विचारही न करतां येण्यासारखें! थंड हवा खाण्यासाठीं! पुण्यामुंबईच्या उन्हाळी हवेचा त्रास चुकविण्यासाठीं! आम्हींही असेंच उटकमंडला गेलो. (ऊटी हें अधिक परिचित नांव) आम्हीं गेलो ते आपले सहज हवा खायला! आणि आमच्याच सारखी शीण घालवायला आलेलीं रसिक माणसें आम्हांला भेटतील अशी आमची कल्पना होती तशी ती माणसें भेटलीं पण त्यांच्याबद्दल काय लिहिणार? आमच्यासारखींच तीं! त्यांचें वर्णन आम्हींच करायचें म्हणजे आमचेच वर्णन केल्यासारखें होणार! तेव्हां त्यांच्याबद्दल कांहींच लिहीत नाहीं. लिहितो ह्या नव्यानें भेटलेल्या सिंहांबद्दल! त्यांची आठवण कायम आहे. कायम राहणार आहे. म्हणूनच लिहून टाकतो झालं!

आम्ही उटकमंडला गेलों तेव्हां हीं सिंह मंडळीही तिथें जमलीं होतीं **'लायन्स इंटरनॅशनल'** ही संस्था आपणां सर्वांना ऐकून माहित असेल. मुंबई उपनगरांतहि ह्या **"लायन्स क्लब"**च्या शाखा आढळतील. **"लायन्स क्लब"** हे लायन्स इंटरनॅशनल ह्या जागतिक संघटनेचे घटक—शाखारुप होत. लायन्स हे जगांत सर्वदूर पसरलेले दिसतील. त्यांच्या संघटनेंत एक प्रकारची सुसूत्रता दिसेल. मग ते सिंह भारतांतले असो, सिलोनमधले असो किंवा अमेरिकेंतील वा इंग्लंडमधले असो. **'आम्ही सेवा करतो'** असे शपथपूर्वक सांगून हे सिंह सेवेसाठीं उभे राहतात. ह्या जागतिक संघटनेचे जनक (Father of Lionism) आहेत **मेलव्हिन जोन्स** (Melvin Jones) आणि अध्यक्ष आहेत **क्लॉड एम. डी व्होर्स** (Claude M. Devorss) ही संघटना भारतांत आणण्याचें कार्य केले आहे **नोशीर पुंडोल** यांनी! ते ह्या संघटनेचे एक प्रमुख संचालक (International Director) आहेत. हे सिंह ज्या हेतूनें एकत्र येतात ते खालीलप्रमाणें— १) जागतिक स्नेहसंबंधांचा अभ्यास करून जगांत स्नेहमय नातें उत्पन्न करण्याचा यत्न करणें २) उत्तम सरकार व उत्तम नागरिक यांबाबतचीं तत्वें व व्यवहार यांचा पुरस्कार करणें, ३) समाजाच्या सामाजिक नागरिक स्वरुपाच्या व नीतिविषयक स्थैर्याच्या कार्यांत सक्रीय भाग घेणें, ४) मित्रत्व, सहकारिता व परस्पर समजुतीच्या धाग्यांत सर्वांना बांधण्याचा प्रयत्न करणें, ५) सार्वजनिक स्वरुपाच्या व मर्यादित राजकीय स्वरुपाच्या चर्चेसाठीं एक व्यासपीठ तयार करणें. आणि ६) धंदा, व्यापारांत व्यापक नीति-मूल्यें निर्माण करण्याचा यत्न करणें.

ह्या हेतूनें कार्य करणाऱ्या ह्या जागतिक संघटनेची एक विशिष्ट प्रतिज्ञा आहे. ध्वज आहे. चिन्ह आहे. वागण्या बोलण्याबाबत कांहीं नीतिनियम आहेत. ते नियम मोडून टाकणारास काढून टाकण्याचा अधिकार आहे. येणाऱ्या प्रत्येक सभासदानें सिंहासारखेच वागले पाहिजे असा दंडक आहे. त्यांचीं म्हणून कांहीं गाणीं आहेत. तीं सारे सिंह एकदम गातात. We Serve हा त्यांचा बाणा आहे. आणि स्वातंत्र्य, बुद्धिप्रधानता व आमच्या (म्ह. त्या त्या) देशाचें स्वातंत्र्य ह्या त्यांच्या घोषणा आहेत. साऱ्या सिंहांची एक प्रार्थना आहे.

ह्या सिंहांबद्दल बरेंच ऐकत होतों. त्यांनीं कुठें रुग्णालयें बांधून दिलीं तर कुठें रुग्णवाहिका आणून भेट दिल्या. कुठें कुटुंबनियोजन केंद्र स्थापन कर अशी त्यांनी केलेली सेवाही कानीं पडली होती. म्हणून उटीला गेल्यावर ह्या सिंहांचा मेळावा भरणार असें कळतांच आम्हीं हा मेळावा पाहण्याचें ठरविलें. वास्तविक हा मेळावा सिंहांचा होता. त्यांना आमंत्रणें होती. पण मीहि आपली 'मोय' लावून घेतली आणि शिरलों झालं मेळाव्यांत! आगांतुकच गेलो म्हणा ना!

उटकमंड येथें **डिस्ट्रिक्ट ३०४** ह्या विभागाचें ९ वें मल्टिपल अधिवेशन दि. ३१ मे तें ६ जून १९६५ ह्या काळांत उटीला भरलें होतें. लायन्स क्लब ऑफ निलगिरीज् हा निमंत्रक क्लब होता. बर्मा, सिलोन, नेपाळ, उटकमंड वगैरे विभागांतले प्रतिनिधि तेथें जमले होते. ह्या सर्व सिंहांनीं सुरुवातीला एक मिरवणूक काढली बागेंतून— (अरनमोर पॅलेसच्या) त्या बागेंत निरनिराळ्या शाखांच्या ध्वजांसह सारे सिंह मिरवीत गेले. माझ्या लक्षांत राहिला **'मुलुंड'** शाखेचा चिमुकला ध्वज! खूप मोठ्या काठीवर खूप चिमुकला ध्वज! गंमत वाटली पाहून!



अनुक्रमणिका




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

## वजनसुद्धां चुकीचं !

अण्णासाहेबांनीं वजन केलें, तिकिटावरचें वजन पाहिलें, मग मागें छापलेला मजकूर वाचला आणि तिकिट मोठ्या अभिमानानें सुनीतीबाईंच्या हातांत दिलें.

"तुम्ही रुबाबदार आहांत," सुनीतीबाई मोठ्यानें वाचूं लागल्या, "हुशार आहांत. श्रीमंत आहांत. उदार आहांत. या तुमच्या गुणामुळें तुमची स्त्री वर्गावर तावडतोब छाप पडते."

मग वजन पाहून त्या म्हणाल्या, "हं ऽऽऽ ! वजन सुद्धां चुकीचं छापलं आहे मेल्यांनीं." ●●●

## चाळीस प्रकार

मंदा प्रथमच माहेरीं आली तेव्हां आईला म्हणाली, "अग, हे ना कधीं कधीं असं चमत्कारिक बोलतात, कीं मी ना अगदीं गोंधळूनच जाते बाई. त्या दिवशीं मला म्हणतात कसे– 'बटाटे शिजवण्याचे भाजी करण्याशिवाय आणखी चाळीस प्रकार आहेत. याची तुला कल्पना नाहीं असं दिसतं." ●●●

## घोडा हवाय्

निर्मलाबाईंचे दिवस भरत आले होते. तशी त्यांनीं एकदां छोट्या बंड्याला विचारलं, "बंड्या, तुला भाऊ हवा कीं बहीण ?"

"मला भाऊ पण नकोय् नि बहीण पण नकोय्," बंड्या म्हणाला. "मला घोडा हवाय् घोडा." ●●●

## उपाय

"मी सकाळीं दाढी केली," गुंडोपंत चंडिकाबाईंना म्हणाले, "म्हणजे मला दहा वर्षांनीं तरुण झाल्यासारखं वाटतं."

"मग तुम्ही रात्रीं झोपण्यापूर्वीं दाढी कां करत नाहीं रोज ?" चंडिकाबाईंनीं विचारलें. ●●●

## जागतिक समस्या लवकरच सुटणार ?

एका महिला मंडळांत लावलेला बोर्ड:– उद्यां मंगळवार दि. ...रोजीं सायंकाळीं ठीक साडेचार वाजतां 'जागतिक समस्या कशा सुटतील ?' या विषयावर चर्चा करण्यासाठीं सभा भरविण्यांत येणार आहे. सर्व स्त्रियांना स्वयंपाक करण्यासाठीं घरीं वेळेवर जातां यावें म्हणून सभेचें कामकाज ठीक सहा वाजतां बंद करण्यांत येईल. ●●●

## सगळ्या आल्या होत्या

विमलाबाईंना महिला मंडळांतून लवकर परत आलेल्या पाहून अनंतरावांनीं विचारलें, "काय ग, आज लवकरशी परत आलीस ?"

"मग काय करणार ?" विमलाबाई म्हणाल्या, "अहो सगळ्याजणी मेल्या आल्या होत्या, मग आम्हांला बोलायला कांहीं विषयच शिल्लक राहिला नाहीं." ●●●

## कांहीं नवल नाहीं

महिला मंडळाची सिंहगडावर सहल गेली होती. किल्ला दाखवणारा माणूस एका छोट्या चबुतऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला, "तानाजी इथेंच पडला, बरं का."

"कांहीं नवल नाहीं त्यांत," मालतीबाई म्हणाल्या. "मी सुद्धां मघांशीं येतांना धडपडलें त्या दगडावर." ●●●

## एकच !

याच महिला मंडळाची दुसऱ्या एका किल्ल्यावर सहल गेली होती.

"हा किल्ला बांधून तीनशें वर्षें झालीं," किल्ला दाखवणारा माणूस म्हणाला, "पण त्याचा एक दगड अजून इकडचा तिकडे केलेला नाहीं कीं त्यांत कांहीं दुरुस्ती केलेली नाहीं."

"हं ऽऽ !" सुनीति बाई म्हणाल्या, "या किल्ल्याचा आणि आमच्या बिल्डिंगचा मालक एकच दिसतोय, बरं का."

—वि. रा. भाटकर

---

त्या अधिवेशनांत महत्वपूर्ण भाषणें ऐकायला मिळाली ती तीन ! एक सर **सी. पी. रामस्वामी अय्यर** यांचें विषय-- 'India & her cultural Heritage" दुसरें श्री. **के. पी. एस. मेनन** यांचे आणि तिसरें व्हि. **पी. मेनन** यांचे! ह्या तीन्हीं भाषणांत फड जिंकला तो श्री. **के. पी. एस. मेनन** यांनीं! मेनन यांचें भाषण मी प्रथमच ऐकलें. अतिशय कोटीबाज, विनोदी पण ठाम सिद्धांत मांडणारें असें त्यांचें भाषण झालें. त्यांचा परिचय करून देणाऱ्यानें पहिला वकील पहिला परराष्ट्र खात्याचा सेक्रेटरी वगैरे गोष्टी सांगितल्या. त्याचा उल्लेख करून मेनन म्हणाले "ह्या साऱ्यापेक्षां मी माझ्या गांवचा 'लायन्स'चा पहिला अध्यक्ष म्हणून उल्लेख झाला असता तर तो अधिक उचित ठरला असता असें मला वाटतें. 'प्रेस्टिज'बावत नेहमीं बोललें जातें त्यावर भाष्य करतांना मेनन म्हणाले कीं, 'प्रेस्टिज' ही गोष्ट कांहीं 'व्हर्जिनिटी'-सारखी नाहीं. एकदां हरवली–गमावली कीं परत मिळवतांच येत नाहीं. 'प्रेस्टिज' गमावलें असलें तर परत मिळवितां येईल– येऊं शकते!" त्यांच्या ह्या विनोदावर भरपूर हंशा पिकला. त्यांच्या भाषणांत खुमारी असल्यानें तें व्याख्यान फारच रंगलें. सर्वांत उत्तम कार्यक्रम म्हणून त्यांच्या व्याख्यानाचा उल्लेख करतां येईल. सी. पी. रामस्वामी अय्यर यांनीं मागें एकदां मद्रासला बोलतांना 'लायन्स क्लब'ला टोमणा मारला होता–"जनावरांतला क्रूर प्राणी" म्हणून! कारण ते विख्यात रोटरियन आहेत. पण उटीच्या भाषणांत त्यांनीं कोठेंहि औचित्यभंग होऊं दिला नाहीं हें विशेष!

आम्हीं पांच सहा दिवस ह्या सिंहांच्या सहवासांत वावरलों. सूटबुटांत वावरणारे पण स्नेहीपणाचा योग्य अर्थ समजलेले हे सारे सिंह खऱ्या अर्थानें 'माणसाळलेले!' दिसले. We serve हे शब्द वारंवार येत असले तरी त्यामागें भावना मात्र सेवेची दिसली. श्रीमंति आणि सेवा यांचे कांहीं वैरच असते असें मानायचें कारण नाहीं. सेवेच्या पद्धतींत फार तर फरक पडेल इतकेंच ! उटीच्या थंड हवेंत इतकी माणसें सेवाभावानें एकत्र आलीं, नांदलीं व गुण्यागोविंदानें परत गेलीं. तिथें 'सिंह' ही एकच जात ओळखली जात होती. कुणी हिंदु नव्हता, पारशी नव्हता, ख्रिश्चन नव्हता. नेपाळपासून सिलोनपर्यंतचे हे 'सेवाभावी' सिंह पाहून बरें वाटलें.

–संपादक








# “........गात कोकिळा”

**गानहिरा** हिराबाई बडोदेकरांनी साठी ओलांडली. त्यांची एकसष्टी पार्ले येथें फार मोठ्या थाटांत साजरी झाली. आणि आतां इतरही अनेक ठिकाणीं त्यांच्या सत्काराचे कार्यक्रम होत आहेत. हिराबाई बडोदेकरांवर महाराष्ट्रनें सतत प्रेम केलें आहे. बालगंधर्वांवर जें प्रेम केलें, लोकमान्यांवर जें प्रेम केलें, कलेच्या क्षेत्रांतल्या मानकऱ्यांवर जे प्रेम केलें तेंच प्रेम महाराष्ट्रानें हिराबाई बडोदेकरांवर केलें आहे. कलेच्या क्षेत्रांतले हे मानकरी आपण ज्या देव्हाऱ्यांत बसविले आहेत तेथून ते कधीं ढळूं नयेत. जरेचा वारा त्यांना लागूं नये. अपेशाची झळ त्यांना कधीं लागूं नये. त्यांच्या कलागुणांना कुणा दुष्टाची दृष्ट लागूं नये अशी मनोमन प्रार्थना मराठी माणसें करीत आली आहेत. त्यामुळेंच बालगंधर्व वृद्ध झाले, केशवराव दाते थकले, नाना फाटकांचा पल्लेदार आवाज मधूनच कांपतो. वयामुळें शब्द अडखळत, ठेंचाळत जाऊं लागतात ह्या गोष्टी कल्पनेनेंही स्वीकारायला तो तयार होत नाहीं. संगीताच्या क्षेत्रांतील राम मराठे, भीमसेन जोशी, मल्लिकार्जुन मन्सूर, कुमार गंधर्व, माणिक वर्मा ही व यासारखीं माणसें 'वृद्ध' झालीं ही कल्पनाही मनाला 'स्वीकारार्ह' वाटत नाहीं. गानहिरा हिराबाई बडोदेकरांची एकसष्टी ही कल्पनाही स्वीकारणें मनाला फार जड गेलें. कलावंत आणि त्याची कला नेहमीं ताज़ी राहिली पाहिजेत कारण जीवन 'फुलविण्याचें' कार्य त्यांना करायचें असते. अशीच आपली भावना असते.

हिराबाई बडोदेकरांना मी प्रथम पाहिले ते रंगमंचावर! 'संगीत नाटक' ही मराठी रंगभूमीच्या इतिहासांतील एक फार मोठी गोष्ट ! महाराष्ट्राला अभिजात संगीताची जी कांहीं गोडी लागली ती नाटचसंगीतामुळें ! बालगंधर्व, मा. कृष्णराव, विनायकबुवा, दीनानाथ, लोंढे, जोगळेकर, यांजसारख्या रथी महारथींनी आपल्या उमेदीचीं वर्षे रंगमंचावर गाऊन गाजविलीं. सवाई गंधर्व, सूरेशबाबू, सरस्वती राणे, कमलाबाई बडोदेकर व स्वतः हिराबाईंनी 'नूतन संगीत मंडळी'च्या नांवानें मराठी रंगभूमीची व संगीताची साधना केली. त्यांची सुभद्रा मला अजूनही आठवते. 'सौभद्र'मधल्या कितीतरी सुभद्रा (पुरुष सुद्धां) मी पाहिल्या आहेत. सौभद्र म्हणजे संगीताची मेजवानी! हिराबाई बडोदेकरांनी सादर केलेली सुभद्रा वर्षानुवर्षे लोकांच्या स्मरणांत राहिली आहे. त्यांची सौभद्रामधली **वद जाऊं कुणाला शरण, पांडु नृपति, व्यर्थ मी जन्मलें थोर कुळीं** ह्यासारखी गाणीं त्यांच्याच तोंडून ऐकायला अजूनही रसिक श्रोत्यांचे कान आसुसले असतात. **उपवनीं गात कोकिळा, जनमानस मंदिरांत, राधेकृष्ण बोल, सखे मी मुरारी** ह्यासारखी कितीतरी गाणीं अजूनही कुठें लागली तर हिराबाईंच्या स्वरमाधुरीला दाद द्यावीशी वाटते. रंगभूमीवरील त्यांच्या भूमिका म्हणजे त्यांचा 'उभा' जलसा असे. संगीत नटाकडून लोक 'संगीता'चीच अधिक




अपेक्षा करतात. अभिनयाबद्दल ते 'क्षमाशील' असतात. हिराबाईंना हा नाद महागांत पडला. पण जनमानसांत हिराबाईंना प्रवेश मिळाला तो त्यांतूनच ! त्यांचे जलसे ही मोठी देन आहे. "गाणें बजावणें" ही गोष्ट फारशी 'बरी' मानली जात नव्हती अशा काळांत हिराबाईंनी जाहीर जलसे करून, गांवोगांव 'सूर' पोंहचविले. (सूर शब्दावर अधिक भर) त्यांच्या गाण्याच्या बैठकींत कसलाही "शो" नसतो. संगीतावरोबर नृत्याचीही झलक पेश करणारे कांहीं गायक मी ऐकले (पाहिले) आहेत. समोर कांहीं 'आपलीच' माणसे बसवून कृत्रिम उपायांनीं 'गाणें उठवण्या'चे होणारे प्रकारही पाहिले आहेत. पण हिराबाईंची बैठक त्यांच्या शांत, संयत स्वभावाप्रमाणेंच कुठलाही दिमाख न मिरवितां पण अंगभूत गुणांमुळें 'दिमाख' मिरवून जाते. गेलीं चाळीस वर्षे हिराबाई भारताच्या संगीत-क्षितिजावर तळपत आहेत. संगीत ही त्यांनी सतत साधना मानली म्हणून त्यांचें गाणें सतत 'ताजेतवानें' राहिलें. आहे. 'बनचुके'चा वारा त्या साधनेला बाधूं शकला नाहीं. त्यामुळेंच नित्य नवें त्या मिळवीत राहिल्या आहेत. हिराबाईंच्या जवळ 'विद्युल्लते'चें व्यक्तित्व नाहीं. ती जात समयीतल्या मंदपणें तेवत राहणाऱ्या व वातावरण उदात्त करणाऱ्या वातीची आहे. साधी राहणी व थोर साधना ह्यांचा संगम म्हणजे हिराबाई! सुरांइतकेंच त्यांचें स्वतःवरही स्वामित्व आहे. संगीतावर, त्यांच्या सामर्थ्यावर त्यांची अपार श्रद्धा आहे. त्या श्रद्धेंतूनच त्यांनी 'संगीत' घरोघर नेणाऱ्या 'बैठकी' सुरूं केल्या. आज घरंदाज स्त्रिया 'गायकी' करतात. त्यांत नांव 'बद्दू' होतेसें वाटत नाहीं. ही प्रतिष्ठा हिराबाईंनीं संगीताला मिळवून दिली आहे. गेलीं चाळीस वर्षे ह्या गुणी गायिकेनें महाराष्ट्राला गान-ऋण दिलें आहे. आज त्यांच्या सत्कारांचे रूपानें त्याची अंशात्मक फेड करण्याची कृतज्ञता महाराष्ट्र दाखवतो आहे. त्या असंख्य फुलांत आमचेही एक ! !

## कुमार गंधर्व

**"संगीत** सृष्टींतील प्रश्नचिन्ह" म्हणून कुमारांचा उल्लेख सुमारे २५ वर्षांपूर्वी कै. गोविंदराव टेंबे यांनीं केला होता. त्यानंतरच्या काळांत कुणी त्यांचा उल्लेख "संगीत सृष्टींतील एक उद्गार चिन्ह" वा "संगीत कलेंतील एक अलौकिक चमत्कार"







अनुक्रमणिका

असाही केला आहे. पण अखेर ह्या शब्दसंहितेंत कुमारांच्या गानकर्तृत्वाचें वर्णन पूर्णपणें येते असें वाटत नाहीं. कुमारांच्या संगीताचें वर्णन शब्दांत करण्याचा प्रयत्न हा जसा त्या त्या माणसानाच 'अपूर्ण' म्हणून समाधान देऊं शकत नाहीं तद्‌वतच कुमारांच्या व्यक्तित्वाचें वर्णनही शब्दांकित करणें कठिण आहे. तें व्यक्तित्व प्रवाही आहे. पाऱ्यासारखें आहे. क्षणाक्षणाला नवता धारण करणारें, नवतेचा ध्यास घेणारे, नवतेनेंच जणुं आंतून मोहरून येणारें असें आहे. आणि त्यामुळेंच आजचें वर्णन उद्यां जुनें, शिळें होण्याची भीति संभवते. सतत विकसित होत गेलेलें, नवीन नवीं रुपें दाखविणारें त्यांचे संगीत आणि त्या 'तशा' संगीताचे वेडानें भारून गेलेले कुमार गंधर्व ह्यांत अभेद आहे. तें एकच आहे.

कुमार गंधर्वांचें नांव आहे **शिवपुत्र कोमकाळी**. पण लोकांचें नातें आहे तें कुमार गंधर्वांशीं ! १९३५ सालीं मुंबई येथें जिना हॉलमध्यें भरलेल्या संगीत परिषदेंत बारा वर्षांचा एक मुलगा स्टेजवर येऊन बसला. आणि त्यानें गायला सुरुवात करतांच सारा श्रोतृगण स्तिमित झाला. त्याचें सारें गाणें मंत्रमुग्ध करणारें होतें. गाणे संपताच मंचावर कौतुकाचा आणि बक्षीसांचा नुसता पाऊस पडला. उत्स्फूर्त देणग्या येत होत्या. त्याक्षणीं कुमारांनीं जी रसिक मनावर पकड बसविली ती आजही कायम आहे.

त्यानंतर प्रा. बा. र. देवधर ह्यांनीं कुमारांना हातीं धरलें. वयाच्या तेविसाव्या वर्षापर्यंत ते देवधरांकडे होते. त्या काळांत त्यांनीं खूप गाणें ऐकले. नवनवीन चीजा मिळविल्या. पण घराण्याची शागिर्दी पत्करली नाहीं. महत्वाकांक्षी मन, संवेदनाशील मन, धाडस आणि संगीतविषयक चर्चा–चिकित्सा यांतून कुमार विकसित झाले. १९४१ ते १९४७ ह्या काळांत गाणें होत होते. पण गाणें 'आलें' असें मात्र त्यांना वाटत नव्हते. कांहीं तरी नवें द्यायचें आहे ही इच्छा टोंचत होती. देवासला १९४७ मध्यें कृष्णराव मुजुमदारांकडे ते गेले आणि एके रात्रीं 'भीमपलास' असा जमला कीं, 'गाणें आलें' असा साक्षात्कार त्यांना आला. पुढें त्यांना क्षयानें ग्रासलें. १९४७ ते ५२ ह्या काळांत त्यांनीं लोकगीतांची साधना केली आणि मग त्यांच्या प्रतिभेला नवे पंख फुटले. त्यांतून नवी सुरावट सांपडली. नवे राग गवसले. आणि तेथपासून आजतागायत कुमार सतत विकसित होत राहिले आहेत. त्यांचे संगीत ही एक किमया आहे. त्यांच्या एकशें छत्तीस बंदिशींचा एक संग्रह **'अनूपरागविलास'** ह्या नांवानें मौज प्रकाशनानें नुकताच प्रसिद्ध केला आहे. कुमारांनीं त्यांत सुरावट दिली असली तरी कुमार स्वतः गायला बसतात तेव्हां आंतून नवनवीन सूर त्यांना बोलावीतच असतात. पुस्तकांनीं कलेला मार्ग दिसतो. प्रवास अखेर सुरांच्या साथीनेंच करायचा असतो. कुमार गंधर्वांनी संगीताला बंडखोरी दिली, नवे राग दिले, नव्या बंदिशी दिल्या, कांहीं मिश्ररागांचे लेणें चढविलें आणि तरीही कुमारांच्या गानकर्तृत्वाचे शाब्दिक वर्णन कठिण आहे. प्रतिभेचें वर्णन शब्दांत कसे करणार? तो एक 'अनुभव' आहे. आणि तो ज्याचा त्यानें 'घेतलाच' पाहिजे. पुस्तकाच्या निमित्तानें 'मौज'नें हा अनुभव घेण्याची संधि दिली. ज्यांना घेतां आली ते धन्य झाले असतील.

जन्मजात सुरांचे लेणें लेवूनच आलेल्या कुमारांना व त्यांच्या बंडखोरीला हें अभिवादन! !

## "आलमगीर" बावडेकर

**"आलमगीर"** बावडेकर हें वाचायला कससंच वाटतं नाहीं ? पण कांहीं कांहीं माणसें त्या त्या नांवानंच पटकन ओळखतां येतात. त्या नांवांत त्यांच्या आयुष्याचें सारे सार गवसते. त्यांची सारी कर्तृक पुढें उभी राहते. त्यांचीं सारीं वैशिष्ट्यें त्या एका शब्दानं सांगून टाकतां येतात. 'आलमगीर' बावडेकर ह्या नांवाचंही असंच आहे. चं. वि. बावडेकर हें नांव धारण करणारी ही 'व्यक्ति' महाराष्ट्राच्या पत्रसृष्टींत व साहित्यसृष्टींत परिचित आहे ती मात्र 'आलमगीर' बावडेकर म्हणून! इतका 'आलमगीर' ह्या नांवाचा आणि बावडेकर ह्या नांवाचा घनिष्ट संबंध आहे. कै. रामभाऊ तटणीस ह्यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'विविधवृत्त' ह्या साप्ताहिकानें मराठी पत्रसृष्टींत फार मोठा इतिहास घडविला आहे. पत्रसृष्टींत गाजून अस्तंगत झालेल्या, पण तरीही येणाऱ्या कितीतरी पिढ्यांना आपल्या पत्रकर्तृत्वानें आदर्श घालून देणाऱ्या साप्ताहिकांत विविधवृत्त, नवयुग, मौज, झंकार, रविवार ह्या साप्ताहिकांचा समावेश होतो असे मला वाटतें. 'विविधवृत्त'ची दखल साहेबाला घ्यावी लागत असे.

कॉंग्रेस राजवटीला तर 'विविधवृत्त' ही फार मोठी दहशत होती. 'आलमगीर' हें सदर वाचण्यासाठीं केवळ विविधवृत्त घेणारीं माणसें होती. वृत्तपत्रांनीं जागरूक राहून जनहिताची काळजी वाहणें हें जर काम असेल तर तें काम 'आलमगीर' अतिशय चोखपणें बजावीत असे. मर्मभेदी लेखन आलमगीरनें केलें. अचुक तपशील मिळविणें, त्यावर अत्यंत बोंचऱ्या भेदक शैलीत टीका टिप्पणी करणें, त्यासाठीं उपरोध, उपहास ह्या शक्तींचा उपयोग करणें हें आलमगीरचें वैशिष्ट्य ! हीं वैशिष्ट्यें घेऊन बावडेकरांनी 'आलमगीर' सजविला, वर्षानुवर्षे सजविला. आणि दुर्दैवानें त्यांना 'विविधवृत्त' सोडावें लागलें. 'आलमगीर'चें कर्तृत्व कुणाचें ह्या प्रश्नाला 'आलमगीर' ह्या नांवाचेंच साप्ताहिक काढून त्यांनीं चोख उत्तर दिलें आहे. आजही 'आलमगीर' वाचला जातो तो मुख्यतः बावडेकरांच्या लेखणीसाठींच! साप्ताहिकांचे संसार आटोपले आहेत. दैनिकांत ती जाऊन बसलीं आहेत. अशावेळीं बावडेकर एकाकीपणें लढत आहेत. त्यांची पत्रनिष्ठा यांत दिसून येते. गेलीं ४० वर्षें ह्याच जीवननिष्ठेनें त्यांनी हा व्यवसाय केला. आज ते साहित्य संघातही कार्यवाह म्हणून काम करीत आहेत. पण बावडेकर स्वतः प्रसिद्धीपटु असूनही स्वतःबद्दल मात्र प्रसिद्धिपराङ्मुख आहेत. शांतपणें ४० वर्षें ही साधना करूनही, हातीं वृत्तपत्र असूनही त्यांनी कधीं आत्मगौरवाची ओळही त्यांत येऊं दिली नाहीं. व्यासपीठापासून, छायाचित्रकारापासून, हा माणूस सतत दूर दूरच रहात गेला. वास्तविक त्यांचें कर्तृत्व स्वयंसिद्ध आहे. त्यादृष्टीनें त्यांच्या कर्तृत्वाचा सन्मान ह्यापूर्वीच व्हायला हवा होता. वर्षानुवर्षे मी बावडेकरांना पाहतो आहे. त्यांच्या राहणीतला साधेपणा कायम आहे. चष्म्याआडचे भिरभिरते डोळे, अस्थिर दृष्टि सारखी कांहींतरी शोधत असतांना दिसते आहे. 'स्नेही' बावडेकर हा अनेकांच्या अभिमानाचा विषय आहे, हें मला माहित आहे. त्या स्नेहापोटीं होणारा बावडेकरांचा सत्कार निःसंशय उचित असाच आहे. बावडेकरांच्या पत्रकर्तृत्वाला हा मानाचा मुजरा !

**—आदित्य**





# कोंबडीशिवाय उरूस नाहीं........!

**मुंबई** व उपनगर मराठी साहित्य संमेलनाचें १८ वें अधिवेशन जून महिन्याच्या १२ व १३ तारखेस भरविलें जाणार ही वातमी मुंबईतील सर्व मराठी वृत्तपत्रांतून झळकली तेव्हां १ जूनपासून हक्काची रजा घेऊन बाहेरगांवीं जायचा ठरविलेला बेत मी रद्द केला. वाटलें, बाहेरगांवीं गेलों तर दोन दिवसांच्या या साहित्य-दिवाळीला आपण मुकूं. साहित्य संमेलन म्हणजे नव्या जुन्या सरस्वतीभक्तांचा मेळावा. त्यांतून हें मुंबई आणि उपनगरांतील यच्चयावत् साहित्यिकांचें संमेलन म. म. पां. वा. काणे, प्रा. न. र. फाटक या ज्येष्ठांपासून तों विजय तेंडुलकर, ज्ञानेश्वर नाडकर्णी व दिलीप चित्र्यांपर्यंत आणि दुर्गा-भागवतांपासून अनेक नव्या विदुषींपर्यंत शेंकडों साहित्यिकांचें दर्शन आपल्याला तिथें घडेल; बृहन्मुंबईतील नियतकालिकांचे संपादक, वातमीदार, छायाचित्रकार यांचा एक मेळावाच आपल्याला तिथें पाहायला मिळेल; व दोन दिवस एक ज्ञानसत्र अवलोकायची पर्वणी लाभेल अशा कल्पनेंत ११ तारखेपर्यंत मी मशगुल होतों. केव्हां एकदां १२ तारखेची संध्याकाळ उजाडते असें मला झालें.

१ तारखेपासून रजेवर असल्यानें मधले पांच सहा दिवस मी उगीचच साहित्य संघ मंदिराच्या आसपास घोटाळत होतों. संमेलनाच्या पूर्वतयारीची कांहीं तरी झलक दिसेल असें वाटत होतें; पण नुसता एक मांजरपाटाचा पडदा संघमंदिराच्या मधल्या दरवाज्यावर अडकविण्यापलीकडे दुसरी कोणतीच चळवळ संमेलन प्रत्यक्ष सुरू होईपर्यंत घडलेली दिसली नाहीं; पण असल्या पूर्वतयाऱ्या म्हणजे साहित्यसंघांतील उत्साही कार्यकर्त्यांच्या हातचा मळ आहे याचीहि जाणीव होतीच. त्यामुळें काळजी करायचेंहि कारण नव्हतें.

## संमेलन कीं एखादा पडेल नाट्य-प्रयोग ?

संमेलन सायंकाळीं ६ वाजतां सुरू व्हायचें असल्यानें डॉ. भालेराव सभागृहांत खालींच जागा मिळवावी या उद्देशानें बराच लौकर गेलों. आसन क्रमांक घेतला आणि सभागृहांत पाऊल ठेवतों तों तिथें चिटपाखरूंहि नाहीं. किंवा समारंभाच्या कसल्या खुणाहि नाहींत. घड्याळांत पाहिलें तों साडेपांच वाजून गेले होते. संमेलन आज आहे कीं उद्यां अशा संभ्रमांतहि सांपडलों; पण थोड्या वेळांत फुटलेल्या गलबतावरून एक एक यावा तशी माणसें येऊं लागलीं. साडेसहा वाजेपर्यंत जवळ जवळ ६५ ते ७० माणसें जमलीं आणि साडेसहाला संमेलनाला सुरुवातहि झाली. हें साहित्यसंमेलन कीं एखादा पडेल नाटकाचा प्रयोग हें कळेना. ज्या कल्पना उराशीं बाळगून संमेलनाला आलों त्यांतलें कांहींहि आढळलें नाहीं. हाताच्या बोटांवर मोजावे इतकेच साहित्यिक. तरुणांपैकीं कुणीहि नाहीं. कट करून वहिष्कार टाकावा तसें सारें वातावरण. सुन्न. एखाद्या नव्या कंपनीच्या 'शेअर होल्डर्स'च्या वार्षिक सर्वसाधारण सभेसारखें.

वेदमंत्रानें अधिवेशनाला सुरुवात झाली. आणि त्यानंतर साहित्य संघाचे अध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांनीं संमेलनाध्यक्षांचा–बारीक बारीक ढेकर देत–अतिसहजपणानें परिचय करून दिला. आणि थोड्याच वेळानें तितक्याच सहजपणानें आपली छत्री घेऊन ते निघूनहि गेले. गांवांत खूप लग्नें असलीं म्हणजे एक लग्न आटोपून पुरोहित जसा दुसरें लग्न लावायला हळूच सटकतो तसेंच त्यांचें तसें जाणें वरें वाटलें नाहीं. स्वागताध्यक्ष प्रा. वि. ह. कुलकर्णी. त्यांनी स्वागताध्यक्षांच्या आजवरच्या परंपरेला सोडून (म्हणजे या नगरींत कुणी कुणी आतांपर्यंत काय काय पराक्रम केला वगैरे) भाषण केलें. साहित्य संघाने केलेल्या–आणि असंख्य वेळां ऐकलेल्या–साहित्यिक चळवळींचा इतिहास त्यांनी प्रत्येक वाक्याच्या अखेरीस जोर देऊन सांगितला. यानंतर संदेशवाचन झालें आणि अध्यक्षांना हार अर्पण केल्यानंतर अध्यक्षांच्या भाषणाला सुरुवात झाली.

## सारेंच निरस

स्वागताध्यक्षांनी संघाचा जुना इतिहास सांगितला आणि अध्यक्षांनीदेखील--गेल्या वीस वर्षांत अनेक साहित्यसमारोहांत कित्येकांनी घेतलेला–संत-पंतांपासून शाहिरांपर्यंत जुन्या साहित्याचाच आढावा बराच निरसपणें घेतला. प्राचीन वाङ्मयाचा एखाद्या विद्यार्थ्यानें आढावा घ्यावा तसा. त्यांतील विधानेंहि अस्ताव्यस्त. चावून चोथा झालेलीं. संत, पंत आणि शिवकालीन शाहिरांनी सामाजिक उद्धाराची दृष्टि जवळ बाळगून त्या हेतूनेंच साहित्यनिर्मिति केली. हें सर्व सामान्यांनादेखील माहिती आहे; परंतु हा आढावा घेतल्यानंतर अध्यक्ष प्रा. श्री. भवानीशंकर पंडित हे नव्या साहित्यिकांना कांहींतरी अमोलिक असा संदेश देतील असें वाटलें होतें; पण तार तुटावी आणि मध्येंच मैफल बंद पडावी तसें त्यांनीं आपलें भाषण फार वेळ झाला म्हणून चटकन् आवरतें घेतलें. एकंदरींत स्वागताध्यक्षांनीं काय, न. र. फाटकांनी काय किंवा संमेलनाध्यक्षांनी काय सर्वांनींच .(हें आतां कसें तरी निस्तारलेंच पाहिजे या पद्धतीनें) सिंहावलोकनें केलीं. साहित्यसोहळ्याचा महत्वाचा कार्यक्रम अशा रीतीनें एकदांचा आटोपला. रात्रीं 'यशवंतराव होळकर' हें नाटक होणार होतें; पण तें रद्द झालें व त्याऐवजीं नाट्य संगीताचा सामान्य कार्यक्रम झाला.

संमेलनानिमित्त दुसऱ्या दिवशीं सकाळीं 'मराठी भाषेंत कादंबऱ्यांचें पीक भरपूर पण कादंबरीकार नाहींत' अशा अर्थाचा एक परिसंवाद ठेवण्यांत आला होता. या कार्यक्रमाला तरी बृहन्मुंबईतील बहुसंख्य कादंबरीकार हजर राहतील अशी अपेक्षा











अनुक्रमणिका

होती; पण नाहीं. पन्नास साठ प्रेक्षकांहून अधिक कुणी हजर राहिलें नाहीं. आम्ही जिवंत असून आम्हांला 'असून नसल्यासारखे' म्हणतात म्हणजे काय? अशा अपसमजामुळें मुंबईतील कादंबरी-कारांनी या कार्यक्रमावर बहिष्कार टाकला नसावा ना? हा परिसंवाद अगदींच गुळमुळीत झाला. सर्वानुमतें–'कादंबऱ्या आहेत पण कादंबरीकार नाहींत' असें ठरलें. पावणेसहाला सुरू झालेली ही चर्चा बरोबर बारा वाजतां संपणार होती; पण 'वक्त्यांना संमेलनातर्फे' मेजवानी असल्यामुळें ती पावणेबारालाच संपविली गेली'. असें कांहीं प्रेक्षक म्हणाले.

## एक मनोज्ञ कार्यक्रम

'शास्त्रीय साहित्य संमेलन' हा साहित्य संमेलनाला जोडलेला कार्यक्रम फार चांगला होता व त्यांत योजनाचातुर्यहि होतें. विशेषतः शास्त्रीय परिभाषा हा परिसंवाद उत्तमच होता. या कार्यक्रमाचे अध्यक्ष डॉ. जी. एस. कसबेकर. भारत सरकारच्या कोटि कोटि रुपयांच्या अनेक प्रचंड प्रकल्पांवर प्रमुख संचालक म्हणून त्यांनी आपली कारकीर्द गाजविलेली. पिंपरी येथील 'अँटिबायोटिक्स'चा कारखाना, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ केमिकल्स, हिंदुस्थान ऑरगॅनिक केमिकल्स असल्या भव्य संस्थांचे ते यशस्वी अध्यक्ष. आणि स्वागताध्यक्ष होते सर्वपरिचित प्रा. का. रा. गुंजीकर. अध्यक्ष आणि स्वागताध्यक्षांची भाषणें अल्प वेळांत ज्ञानांत भर टाकणारीं झालीं. 'शास्त्रीय परिभाषा' परिसंवादांत डॉ. वि. घों. कर्वे यांनीं 'बहुभाषिक भारतांत परिभाषा निर्मिणें ही कठीण गोष्ट असून मूळ इंग्रजी शब्दांना आपल्यांत समाविष्ट करण्याचें आवाहन केलें तर श्री. भालबा केळकरांनीं गीर्वाण भाषेंत ही शब्द योजना करावी व डॉ. रघुवीर यांनी केलेल्या तशा प्रयत्नांबद्दल त्यांचा गौरव केला. श्री. प. म. बर्व्यांनी या-विषयीं स्तुत्य असे विचार मांडले. वक्त्यांचा परिचय व आभार श्री. रा. वि. सोहोनी यांनी मानले. एकंदरींत हें जोड संमेलन चांगलें झालें. पण प्रेक्षकांची संख्या मात्र वाढली नाहीं ती नाहींच.

## फीशसह राईसप्लेट ठेवली असती तर

असो! साहित्य संमेलन झालें. जो हेतु मनांत धरून मी माझा बाहेरगांवीं सुट्टी घालवायचा बेत रद्द केला तो हेतु सफल झाला नाहीं. असें झालें तरी काय कीं ज्यामुळें मुंबापुरींतील साहित्यिक आणि साहित्यरसिक मंडळी या बाजूला फिरकली-देखील नाहीं? आलतु फालतु सत्कारांना आणि पुण्यतिथ्यांना पुरे पुरे म्हणेपर्यंत नेहेमींच तुटून पडणाऱ्या मुंबापुरस्थ रसिकांना संमेलनाच्या प्रतिनिधिपदाची तीन रुपये वर्गणी ज्यास्त तर वाटली नसावी? आणि हेंच एक कारण बरोबर असावें. इथून ५०० मैलांवर गोव्यांत भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या प्रतिनिधीपदाची वर्गणी दहा रुपये होती. साठी ओलांडलेल्या-पासून पांच वर्षांच्या मुलांपर्यंत असंख्य स्त्रीपुरुषांनी तिथें गर्दी केली. दहा रुपयांत आठदहा पोटभर जेवणें, गोवें पहाणें, स्वस्तांत 'पिणें', फॉरॅन वस्तूंचें संशोधन शिवाय मिळालेल्या वेळांत साहित्यसंमेलनांतहि भाग घेतां येत होता. दहा रुपयांत इतकीं आकर्षणें होतीं. बृहन्मुंबईतले झाडून सारे साहित्यिक 'भक्ति-भावानें' सहकुटुंब सहपरिवार तिथें गेले. मग साहित्यसंघानें इथल्या इथें पांच आणि तीन रुपये घेऊन साहित्य संमेलन या नांवाखालीं अन्य कोणतीं आकर्षणें ठेवलीं होतीं कीं जेणेंकरून मुंबईतील साहित्यिकांनीं सहकुटुंब सहपरिवार तिथें हजर राहावें? तीन रुपयांत एखादा भरपूर करमणुकीचा कार्यक्रम आणि एखादें पक्वान्नाचें जेवण–निदान चहा, चिवडा, बटाटेवडा तरी? आणि पांच रुपयांत मटण–मुरगी–निदान 'फीश'सह राईसप्लेट तरी ?

## थोड्या पैशांत भरपूर हवे

यापुढें दरवर्षी हें मुंबई आणि उपनगर साहित्य संमेलन भरविण्यांत येणार आहे अशी स्वागताध्यक्षांनी संघाच्या वतीनें घोषणा केलेली आहे. यापुढें तरी या बाबतींत संमेलनाच्या सूत्रचालकांनी सावधगिरी बाळगावी. हें संमेलन भरवितांना जागा अशी निवडावी कीं, जेणेंकरून मुंबईतील साहित्यिकांना सह टुंब दोन दिवस मजेत घालवितां येतील. बृहन्मुंबईत सुदैवानें सहलीची ठिकाणे पुष्कळ आहेत. कृष्णगिरी उपवन आहे. विहार, तानसा आदि तलावांचे कांठ आहेत. उपनगर ही जोडच असल्यानें तशीं अनेक ठिकाणें आहेत. प्रतिनिधीपदाची वर्गणी कमी हवी आणि त्यांत चार सुग्रास जेवणें, जाण्यायेण्याचा खर्च व इतर सर्व सोयीहि हव्यात. म्हणजे सामिष निरामिष अशा जेवणाच्या दोन्हींहि पद्धति हव्यात. (सामिष त्यांतल्या त्यांत जास्त) सकाळीं 'ब्रेकफास्ट.' सायंकाळीं बटाटे किंवा कांदा पोहे वगैरे. करमणुकहि भरपूर हवी. परिसंवादाच्या चर्चेला 'अश्लिल वाङमयांतील सौंदर्य-स्थळें' असा एखादा हलका फुलका विषय. अध्यक्ष स्वागताध्यक्ष आणि इतर विभागांचे अध्यक्ष हे कीर्तिमुख आणि खळखळून हंसविणारे असावे. . . . . .आणि असें सगळें असलें म्हणजे मग पहा प्रतिनिधीपदाची वर्गणी भरायला सांज सकाळ कशा रांगा लागतील त्या. या संमेलनाला चुकूनहि न फिरकलेले लहान मोठे साहित्यिक मागच्या दारानें घुसून मला प्रतिनिधि करून घ्या म्हणून वशिला लावतील. आणि एकेकाची समजूत घालतां घालतां संघाच्या कार्यकर्त्यांच्या नाकीं नऊ येतील. जुन्या काळाचे सिंहावलोकन आणि मराठी भाषेंतील कादंबरीकार कसा असावा असल्या शुष्क चर्चा पांच व तीन रुपयांत हव्या आहेत कुणाला? 'चक्र'कार आणि 'रथचक्र'कार भल्या मोठ्या आंक-ड्यांचीं बक्षिसें मिळवून स्वस्थ घरीं बसले. ते तर तिथें फिरकलेच नाहींत; पण ते थोर कीं सामान्य ही वृथा चर्चा ऐकण्यांत मात्र माझे तीन रुपये आणि पुरे दोन दिवस फुकट गेले.

**–साहित्य (?) रसिक**















## सरग माथा जीत लिया

**२० मे** १९६५ हा दिवस आधुनिक भारताच्या इतिहासांतील एक सुवर्णदिन म्हटला पाहिजे. त्यानंतर येणारे २२ मे, २४ मे व २९ मे हे तीन दिवसही असेच सुवर्णदिन म्हणून नमूद केले पाहिजेत. कारण त्या चारही दिवसांनीं एक नवा, तेजस्वी पराक्रमाचा इतिहास घडविला आहे. एक नवें आत्मतेज, स्वयंकर्तृत्व प्रगट केलें आहे. एक नवा आत्मविश्वास भारतीयांच्या मनांत उत्पन्न केला आहे. एका नव्या कर्तृत्वाची प्रेरणा दिली आहे. वास्तविक सरग माथ्यावर (माऊंट एव्हरेस्ट) २० मे १९६५ ह्या दिनीं कांहीं पहिला मानव पहिला भारतीय चढून गेला नाहीं. सरग माथ्यावर जातां येऊं शकते. तिथें आपले ध्वज रोवता येऊं शकतात ही गोष्ट १९५३ मध्यें २९ मे ह्या दिवशींच सिद्ध झाली होती. सर जॉन हंट ह्यांच्या नेतृत्वाखालीं सर एडमंड हिलरी व भारताचे तेन्सिंग नोर्के ह्या दोघांनीं त्या दिवशीं सरग माथा सर केला आणि गिर्यारोहणाच्या इतिहासांत एक नवें वारें खेळूं लागलें. वास्तविक एव्हरेस्टवर जाण्याचे प्रयत्न १९२१ पासून चालूं होते. कर्नल सी. के. हॉवर्ड-ब्युरी ह्यांच्या नेतृत्वाखालीं १९२१ सालीं ब्रिटिश गिर्यारोहकांनीं पहिला प्रयत्न केला. त्यांतील डॉ. ए. एम्. केलास हा सभासद १७२०० फुटावरील एक खिंड ओलांडतांना हृदयक्रिया बंद पडून मेला. व इतर तीन सभासद २२९९० फुटावरील 'छाँग ला' (Chang La) येथपर्यंत पोंहचले. १९२२ सालीं दुसरा प्रयत्न झाला. त्यांतील मंडळी २७३०० फुटापर्यंत चढून जाऊं शकली होती. १९२४ सालीं तिसरा प्रयत्न झाला. त्यांत प्राणवायूची सज्जता ठेवून जी. एल्. मेलॉरी व अॅण्ड्रयू आयर्विन हीं दोन माणसें २६७०० फुटावरून वर गेली आणि पुन्हां दिसलींच नाहींत. त्यानंतर तिबेट मार्गें हिमालयाचें आरोहणच दलाई लामांनीं ८ वर्षेपर्यंत बंद केले होते. त्यानंतर १९३३, १९३४, १९३५, १९३६, १९५० व १९५२ ह्या वर्षीं एव्हरेस्ट विजयाचे प्रयत्न झाले. पण त्यांत यश आलें नाहीं. अखेरीस २९ मे १९५३ ला हिलरी-तेन्सिंगनें नवा विश्वास जगाला दिला. त्यानंतरच्या काळांत १९५६ सालीं ३३ जणांच्या स्विस-तुकडीनें एव्हरेस्टवर स्वारी केली व त्यांतील अरनेस्ट शिमीड व जर्ग मार्मेट हे २३ मे ला व अॅडॉल्फ रीस्ट व हॅन्सरुडॉल्फ हे २४ मे ला एव्हरेस्टवर चढून गेले. ह्या सर्व प्रयत्नांत भारतीय गिर्यारोहक व शेर्पा हीं मंडळी त्यांच्याबरोबर होतीं. परंतु संपूर्णतया भारतीय गिर्यारोहकांनीं स्वतःच्या नेतृत्वाने, कर्तृत्वानें ही झेंप घेतली नव्हती. पण १९६० मध्यें ब्रिगेडियर ग्यानसिंग ह्यांच्या नेतृत्वाखालीं पहिला भारतीय प्रयत्न झाला. त्यांतील कॅप्टन नरेंद्र कुमार, सोनम ग्याट्सो व नवांग गोंबू (शेवटचे दोन यंदा यशस्वी झाले आहेत) ह्यांनीं २८३०० फुटांची झेंप घेतली होती. पण पुढें प्रतिकूल हवेमुळें त्यांना परतावें लागले होते. दुसरा भारतीय प्रयत्न १९६२ मध्यें जॉन डायस यांच्या नेतृत्वाखालीं आला. त्यांनाही तो प्रयत्न २८६०० फुटावर जाऊन सोडून द्यावा लागला होता. ह्या प्रयत्नांत मोहन कोहली, सोनम ग्याट्सो व हरिडांग ह्यांनीं ती उंची गांठली होती. (ह्यांतील ग्याट्सो यंदा यशस्वी) त्यानंतर इतर देशांनीं कांहीं प्रयत्न केले. त्यांत १९६३ मध्यें अमेरिकन गिर्यारोहकांपैकीं ६ माणसें एव्हरेस्टवर जाऊन पोंहचली व त्यांनीं एक नवा उच्चांक सिद्ध केला. त्यांत जेम्स व्हिटेकर व नवांग गोंबू हे १ मेला सर्वप्रथम शिखरावर चढून गेले.

पण यंदा संपूर्ण भारतीयांच्या तुकडीनें केलेल्या पराक्रमाला तोड नाहीं. केवळ 'भारतीय' म्हणून मी हें म्हणत नाहीं. अनेक नवे उच्चांक त्यांत आहेत. अमेरिकन तुकडीनें तीन प्रयत्नांत (१९६३) **सहाच** माणसें एव्हरेस्टवर धाडली तर भारतीय तुकडीनें **चार वेळां** केलेल्या प्रयत्नांत एकूण **नऊ** माणसें एव्हरेस्टवर पाठविलीं. एकाच तुकडीनें केलेला हा पराक्रम गिर्यारोहणाच्या (व जगाच्या) इतिहासांत अतुलनीय आहे खास ! '**नवांग गोंबू**' हा सदस्य एकूण **दोनदां** एव्हरेस्टवर चढून गेला हें वैयक्तिक रेकॉर्ड ! सोनम ग्याट्सो ह्यानें सतत प्रयत्न करून २८३००, २८६०० फूट उंचीवर जाऊन आपल्या अंतिम विजयाची जणुं ग्वाहीच दिली होती. ले. क. एम्. एस्. कोहली ह्यांच्या नेतृत्त्वाखालीं नवा इतिहास निर्मिणाऱ्या पराक्रमी भारत पुत्रांचीं नांवें, पुढील प्रमाणें आहेत. तीं नांवें स्मरणांत ठेवणें व त्यांचें अभिनंदन करणें हें आपलें कर्तव्य आहे असें मला वाटतें. दिनांक २० मे रोजीं चढून गेलेल्या वीरांचीं नांवें– कॅप्टन **ए. एस. चीमा व नवांग गोंबू** ! दि. २२ मे चे मानकरी **सोनम वांग्याल व सोनम ग्याट्सो** ! दि. २४ चे मानकरी – **सी. पी. व्होरा** व **आंग कामी** ! व दि. २९ चे विक्रमाचे रेकॉर्ड करणारे वीर– कॅ. **एच. एस. अहलुवालिया, एच. सी. एस. रावत** व **फू दोरजी**. यांतील सोनम वांग्याल हा सर्वांत लहान (२३) व सोनम ग्याट्सो हा सर्वांत मोठा (४२) गिर्यारोहक होय. ह्या नऊ गिर्यारोहकांनीं भारताची शान वाढविली आहे. राष्ट्रध्वज जगांतल्या सर्वोच्च शिखरावर नेऊन रोंवला आहे. आजच्या भारताच्या इतिहासांत '**असे क्षण**' कमी येतात. त्यामुळें ह्या क्षणांना सोन्याचे मोल आलें आहे. आपण तें ओळखून ह्या पराक्रमी पुत्रांचें अभिनंदन करूं या !






## राजकारण

# कालपुरुष क्षमा करणार नाहीं

**रण** थांबले आहे. कच्छचे रण शांत आहे. प्रत्यक्ष युद्ध म्हणून ज्याला म्हणतात तें आज चालूं नाहीं. 'सीमाभंग' ह्या नांवानें कांहीं 'प्रेमसंवाद' प्रतिदिन होतो. कांहीं तोफा गरजतात. फैरी झडतात. कांहीं माणसें (युद्धांतल्या प्रमाणेंच) जखमी होतात वा देवा घरीं (या अल्ला घरीं) जातात. ह्या प्रेम संवादांची संख्या गेल्या कांहीं महिन्यांत फार वाढली असली तरी युद्ध चालूं नाहीं. आतां सर्वत्र सामसूम आहे. तूर्त 'शाब्दिक' लढाई चालूं आहे. "**आम्हीं हें सहन करणार नाहीं.**" असें आम्हीं पुन्हां पुन्हां टांसून सांगतो आहोंत तर "**भारत हाच आक्रमक आहे. भारतानें युद्ध लादलेंच तर आम्हीं तें जिंकेपर्यंत लढूं**" (जिंकूं किंवा मरूं नाहीं हं) असा विश्वास पाकिस्तानचे रणधुरंधर अध्यक्ष अयुबखान आम्हांला बजावीत आहेत. मध्यस्थांची धांवपळ चालूं आहे. निरोप, प्रेमपत्रें, निषेधपत्रें रागरुसवे वगैरे प्रकार चालूं आहेत. दोस्त राष्ट्रांच्या साक्षी काढण्याचे प्रयत्न चालूं आहेत. नकाशांचे दाखले फडफडताहेत. पुन्हां एकदां मध्यस्थ, लवाद, जागतिक न्यायालय वगैरे शब्द सवंगपणें वापरले जात आहेत. 'वाटाघाटी'चे गुऱ्हाळ चालूं झालें आहे. त्याला मुदत नाहीं. तत्व नाहीं. आक्रमक आणि आक्रमित दोघांची पातळी तिथें एक ! आक्रमण त्यानें केलें व संरक्षण मी केले ही दोघांची समान भूमिका ! जणुं वैराची बैठकच नव्हती ! जणुं गेल्या सोळासतरा वर्षांत कधीं कांहीं घडलंच नाहीं. लक्षावधि निर्वासित आलेच नाहींत ? पण तूर्त लढाई नाहीं. वाटाघाटी चालूं आहेत. वाटाघाटी चालूं आहेत म्हणून युद्ध नाहीं. चालूं असेपर्यंत युद्ध नाहीं. पण तूर्त युद्ध नसले तरी मुळांतच तें कां पेटले ? आजही सर्व सीमांवर जी हत्या होते आहे (उभयपक्षीं) ती कां होते आहे ह्याच्या मुळाशीं जायला हवें आहे. सीमाभंग होतात. वारंवार होतात. दरमासीं निर्वासितांच्या रांगा लोटतात. सामान्यांच्या जीवित-वित्ताची हानि होते. निषेध खलिते पाठविले जातात. तात्पुरती सामसूम होते. कांहीं निर्जीव कागदांवर सह्या होतात. आणि शाई वाळते न वाळते तोंच पुन्हां गोळ्या उडतात आणि त्या आगींत ते करार जळून जातात. हें असेंच घडत आलें आहे. आणि यांत फारसा बदल होईल अशीं चिन्हें दिसत नाहींत. कारण पाकिस्तानची निर्मिति हीच मुळीं भारत विद्वेषावर झाली आहे. आणि आजही भारत विद्वेष (भारत विनाशही) हेंच पाकिस्तानचे प्रेरणास्थान आहे. **'हंसके लिया पाकिस्तान, लढके लेंगे हिन्दुस्तान'** हे नारे कांहीं केवळ पाकिस्तानांतच गरजत नाहींत. तर हिंदुस्थानांतही घुमतात. हिंदुस्थानांत **'बियार बेट'**, **'पॉइंट ८४'** चे विजय दिन साजरे होतात. राजस्तानमध्यें तर सीमेवरच्या गांवी म्हणे मिरवणूक निघाली, आणि हें सारें पाहिलें कीं, आम्हीं अधिक वस्तुनिष्ठ भूमिका घेण्याची गरज आहे असें मला वाटतें. ह्या बाबतींतलें सारें स्वप्नरंजन, इच्छारंजन, भ्रम आणि एकतर्फी प्रियाराधन आतां संपलें पाहिजे असें वाटतें. १५ ऑगस्ट ४७ नंतर व काश्मीर आक्रमणानंतर **'हमें यह कल्पना न थी'** अशी कबुली पंडितजींनीं दिली होती. पण गेल्या सतरा वर्षांतल्या प्रत्येक घटनेनें आम्हांला सर्व गोष्टींची स्पष्ट कल्पना यायला हवी होती. कच्छबाबतची आजची माहिती अशी आहे कीं, गुजरात शासनानें केंद्राला पाकिस्तानी हेतूंची स्पष्ट कल्पना कांहीं वर्षांपूर्वींच दिली होती. पण राजकारणांत आम्हीं सतत अदूरदृष्टीचे ठरत आलो आहोंत. आणि आज तरी पाकिस्ताननें आमचा त्याही आघाडीवर पराभव केला आहे. कच्छमध्यें रण पेटल्यावर अस्वस्थ होणारी अमेरिका वा ब्रिटन ही राष्ट्रें गेल्या सतरा वर्षांत धर्माच्या नांवाखालीं पाकिस्ताननें जो वंशविच्छेद चालविला आहे त्याकडे मात्र सोयिस्कर दुर्लक्ष करीत आहेत. पूर्व पाकिस्तानमधल्या बुद्ध धर्मीयांचे आतां शिरकाण चालूं आहे. अशावेळीं आपण अधिक स्वाभिमानी, कणखर व वस्तुनिष्ठ भूमिका घेण्याची गरज आहे. वाटाघाटीनाही कांही मर्यादा असते. प्रत्येक वाटाघाटीनें शत्रूला आक्रमण पचविण्याची संधि मिळत गेली आहे. केवळ आपल्याला जागतिक शांततेची भारी चिंता लागून राहिली आहे, ही आपली एक लाडकी कल्पना आहे हें जग जाणतें. म्हणून 'वाटाघाटी'त कालहरण करून चीननें आक्रमण बळकट केले. पाकिस्ताननें अर्धे काश्मीर बळकावले व कच्छमध्यें कांहीं पक्के रस्ते बांधून काढले. आपण **'ही आमची भूमि आहे'** असें म्हणत राहतों. त्याचें प्रत्यक्ष स्वामित्व मात्र आपल्या हातीं कधींच नहतें. काश्मीर हा भारताचा अविभाज्य भाग आहे हें वाक्य आतां हास्यास्पद ठरूं पहात आहे कारण पाकिस्तान स्वतंत्रपणें चीनशीं त्याबद्दल ठराव करूं शकला आहे. आम्हीं निषेध फक्त नोंदविलेला आहे. अनेक अत्याचार, दुराचार, आक्रमणें पचवून पाकिस्तान जगमित्र बनले आहे. आणि सतत थपडा, मार खाऊन आम्हीं मात्र 'न घरका, न घाटका' असें बनलो आहोंत. १९६२ सालचे चीनचें आक्रमण व कच्छचें आक्रमण ह्या आमच्या कसोटच्या आहेत. आज सर्वत्र एक प्रकारची अशांतता, अस्वस्थता, शंकितता दिसते आहे. कुणाच्या तरी कृपेवर सतत जगण्याची लाज वाटूं लागलेली आहे. सर्वांचें लेखी केंद्रस्थान जर हास्यास्पद, अकार्यक्षम, असंरक्षणक्षम ठरले तर सर्व सामान्य जनतेचा विश्वास उडण्याची भीति संभवते. अखेर समर्थ शब्दांच्या मागें समर्थ शस्त्रें उभीं करणें हेंच खरें राष्ट्रीय कर्तव्य ठरते. तें दायित्व तुमच्या आमच्या पिढीवर कालपुरुषानें सोंपविलेलें आहे. त्यासाठीं कांहीं भ्रम, स्वप्नें दूर सारावी लागतील. शासन आणि जनता ह्यांची दिलजमाईच ह्यांतून पार पाडणारे सामर्थ्य उत्पन्न करूं शकेल. शस्त्रें कच्चीं नाहींत, जवान खंबीर आहेत पण मनें—केंद्रीय—खंबीर नाहींत अशी तक्रार ऐकूं येते. काश्मीरचीच चूक आम्हीं कच्छमध्यें केली तर कालपुरुष आम्हांला क्षमा करणार नाहीं.

**—सारस्वत**

### आंबा प्रदर्शनांत पहिलें पारितोषिक

सुप्रसिद्ध मसालेवाले व्ही. पी. बेडेकर अँन्ड सन्स यांच्या आंबा लोणचें व मुरंबा या पदार्थांना गोवा येथे केंद्र सरकारच्या अन्न व शेतकी खात्यातर्फे नुकत्याच भरविण्यांत आलेल्या दक्षिण विभागीय आंबा प्रदर्शनांत, आंब्यापासून बनविलेल्या पदार्थांतील गटांत पहिले पारितोषिक मिळाले.

१९५९ सालापासून केंद्र सरकारनें सुरूं केलेल्या या उपक्रमानुसार दिल्ली, इंदूर, पाटणा, बंगलोर आदि ठिकाणीं भरविण्यांत आलेल्या प्रदर्शनांत बेडेकरांच्या पदार्थांना पारितोषिकें मिळत आली आहेत.

दैनंदिन जीवनात लागणाऱ्या गृहोपयोगी पदार्थांची निर्मीती बेडेकर कंपनी गेलीं ५५ वर्षें सतत करीत आहे.






[ पान ८ वरून चालू – फॅक्ट ]

बाईची भानगड, अनैतिक संबंध. एक ना दोन. कित्येक वेळां मुद्यांची गोष्ट बाजूला राहून, आरोपीनें सांगितलेल्या हकिकतीची पार्श्वभूमि तपासण्यांत तिला मजा वाटे... समाजांतील या गोष्टींची कारणें शोधावीत असें कधीं कधीं वाटे. जोगळेकरांच्या बरोबर ती चर्चा करीसुद्धां. परंतु त्यांनीं या चर्चांची मर्यादा समजावून दिली. आपल्याला खटल्यापुरता फॅक्ट्स्‌चा विचार करावयाचा असतो. विशिष्ट मर्यादेपुरतीच पार्श्वभूमि न्याहाळायची असते. आरोपींचें जीवन.... त्यांच्या कृत्यांची कारणमीमांसा करणें आपलें काम नाहीं. आपण केवळ फॅक्ट्स्‌ची आंकडेमोड करायची आणि आरोपीला तुरुंगाच्या दारांतून मागे खेचायचें. फिर्यादीची बाजू फॅक्ट्स्‌मधल्या सुसंगती मांडून दाखविते, आपण त्या विसंगत आहेत असें दाखवायचें. केवळ आंकडेमोड बस्स. जास्त पुढें जायचें नाही! किती साधा हिशोब होता ! गिरिजेनें ह्या मर्यादा आत्मसात् केल्या. आणि तिचें फॅक्ट्स्‌वर लक्ष केंद्रित होऊं लागलें.

मग एकदां बलात्काराची केस आली. तिनें केसपेपर्स वाचून ठेवले होते. दुसऱ्या दिवशीं आरोपीला बोलावलें होतें. केस-संबंधीं माहिती घ्यावयाची होती. पोलीस टिप्पणांतील फॅक्ट्स् वाचतांना गिरिजा शहारली... थोडीशी संकोचली. आतां जोगळेकर यासंबंधीं आपणाला कशी माहिती देतील अशी शंका तिला आली पण त्यांनीं तिला पहिल्याच दिवशीं सांगितलें होतें. 'संकोच बाजूला ठेवल्याशिवाय फॅक्ट्स् कळून घेतां येणार नाहींत.'

त्या दिवशीं त्या केसची चर्चा करतांना जोगळेकरांनीं निःसंकोचपणें त्यांतील गुंता-गुंत समजावून सांगितली. फिर्यादी पक्षाचा पुरावा कशा प्रकारचा असतो, त्याची आपण कशी दखल घेतली पाहिजे, मुख्य साक्षीदाराला कोणते प्रश्न विचारले पाहिजेत हें समजावून दिलें. एखाद्या शास्त्रीय गोष्टीची माहिती गंभीरपणें सांगावी तसें जोगळेकर तिला समजावून सांगत होते...

पाठीमागे हातात हात गुंतवून जोगळेकर फेऱ्या मारीत सांगत होते. टेबलांवरील कागदांमध्यें पाहात, टिपणें घेत गिरिजा बसली होती.

"अगोदर डॉक्टरांची सर्टिफिकिटें नीट वाच पाहूं."

तिनें कागद चाळले. डॉक्टरांची सर्टि-फिकिटें तिनें डोळ्याखालून घातली. त्यांतून तिला फारसा अर्थबोध झाला नाहीं.

"मुख्य गोष्ट अशी कीं, आरोपी आणि फिर्यादी मुलगी यांना कोणत्या दिवशीं तपासलें ? गुन्ह्यानंतर किती दिवसांनीं ?"

"जवळ जवळ पांच सहा दिवसांनीं."

"मग तें आपल्याला फायदेशीर आहे."

"तें कसें ?"

"अगं. पुराव्याच्या वस्तू शिल्लक राहात नाहींत." मग कांहींसें आठवून त्यांनीं विचारलें.

"आरोपीचे व फिर्यादीचे कपडे ताब्यांत घेतलेल्याचे पंचनामे वाच पाहूं. कोणा-च्याही कपड्यावर रेताचे अथवा रक्ताचे डाग असल्याचा उल्लेख आहे का पहा बरें?"

गिरिजा संकोचली... जोगळेकर तिच्या-कडे न पाहता बोलत होते. दोन मिनिटांनीं स्तब्धता पाहिल्यानंतर जोगळेकरांच्या लक्षांत आलें. त्यांनीं मागे वळून पाहिले नि हंसत तिला म्हणाले, "असं संकोचून चालणार नाहीं. या सर्व गोष्टींचा अभ्यास केला पाहिजे. त्या फॅक्ट्स् आहेत नि महत्त्वाच्या फॅक्ट्स् आहेत. आण बरं ते कागद. मीच पाहतो."

मग फिरत्या खुर्चीवर बसून ते कागद पाहूं लागले.

"हं. हें पहा. तसले कससलेच डाग पोलीसांना सांपडले नाहींत. आपल्या पथ्यावरच आहे हें... आणि तसंच..." जोगळेकर तिच्या डोळ्याला डोळा भिड-वीत सावकाशीनें म्हणाले. "तसंच, फिर्यादी मुलीच्या वैद्यकीय तपासणीमध्यें "Accustomed to intercourse असा शेरा आहे. ही गोष्ट देखील आपल्याला अनुकूल आहे..."

जोगळेकरांनीं पुनः एकदा तिच्याकडे टक लावून पाहिलें.

"तिच्या खराब चारित्र्यावर आपणास प्रश्न विचारतां येतात."

पेन्‌चा मागचा भाग तोंडांत धरून गिरिजा त्या प्रश्नांवर विचार करूं लागली.

साक्षीदारांच्या तपासणीच्या दिवशीं सेशन कोर्टांत जोगळेकरांनीं तिलाच प्रश्न विचारण्याची संधी दिली. ती फिर्यादी मुलीला प्रश्न विचारीत होती... त्या मुली-कडे पाहतां पाहातां व प्रश्न विचारतां विचारतां गिरिजेच्या उरांत एकदा उगाचच धपापलें.फिर्यादी मुलगी राहात असलेली भर कामगार वस्तीतील चाळ, आसपासचे लोक, रात्रीं अपरात्रीं डोळ्यांसमोर घडणाऱ्या गोष्टी, वारंवार कानावर पडणारे अचकट विचकट शब्द, तेथले संस्कार, आई-बापांचा रोजगार, भावंडांची कटकट, वेळोवेळीं मिळणारा एकांत, न लपवतां येणारें तारुण्य...एक ना दोन गोष्टी ? या गोष्टींचा आपण विचार करावयाचा का ? छे ! छे ! मुळींच नाहीं. येथें फक्त फॅक्ट्स् लक्षांत घ्यावयाच्या असतात. गिरिजेनें आपल्या अंतःकरणांतल्या कबुतराला चुच-कारलें. तिच्या लक्षांत आलें; आरोपी केव्हां आला ? किती वेळ बसला ? कोणी पाहिलें ? किती वाजले होते ? किती वेळ भेट झाली ? बलात्कार केला म्हणजे नक्की काय केलें ! असे गणिती प्रश्न विचारायचे असतात..... मग तिनें निर्धावलेल्या पद्धतीनें पुढे प्रश्न विचारले. जोगळेकरांनीं केसचा समारोपही करावयास सांगितलें. पुराव्याचे दिवे कच्चे होते. केस सुटली. गिरिजेचें कौतुक झालें.

—त्याच संध्याकाळीं जोगळेकरांनीं तिची खरोखरीच पाठ थोपटली. गिरिजेला अभि-मान वाटला. तिला वाटलें आतां आपण जोगळेकरांच्या शिष्या खरोखरीच्या शोभतों.

तिच्या खांद्यावर हात ठेवून ते म्हणाले: "गिरिजा, We must celebrate your success आणि बघतां बघतां तिच्या तोंडाचा पटकन् मुका घेतला. आपल्या देहाचा कणन्‌कण फुलून गेल्यासारखे तिला वाटलें...

जोगळेकरांच्याकडे सकाळीं—संध्याकाळीं दोन्ही वेळ जाणें होऊं लागलें. कामें पुष्कळ पडली होती. जोगळेकरांच्या शिवाय तिला चैन पडेनासें झाले होतें. त्यांची केवळ










धंद्यांतलीच हातोटी नव्हे, तर माणसांना हाताळण्यांतील त्यांचं कसवही आकर्षक होतं. त्यांचें आकर्षक व्यक्तिमत्व आणि प्रौढ पुरुषत्व, त्यांचा अनेकविध अनुभव आणि त्रयस्थ वृत्तीनें अनुभव चाखण्याची त्यांची स्थितप्रज्ञ वृत्ति. जाणीवपूर्वक घेतलेला उपभोग. ते रसिक होते—चोखंदळ होते. गिरिजेला कितीतरी गोष्टी कळल्या. अनुभवाला आल्या. तिचें आतां फॅक्टसवर लक्ष चांगलें केंद्रित होऊं लागलें होतें. व्यवसायांत आत्मविश्वास येऊं पाहात होता. जोगळेकर तिच्यावर कांहीं कामें स्वतंत्रपणें सोंपवीत. पण कामाबाबतची सल्लामसलत ऑफिसमध्यें व घरीं देखील होई. कित्येक वेळां तिला मुक्काम करावा लागे त्यांच्या घरीं. कामाच्या रगाड्यांतून विश्रांति म्हणून कधींमधीं बाहेरगांवचीं हवा खाण्या ाठीं दोघेंही जात.

गिरिजा स्वतंत्रपणें व्यवसाय करूं लागली तरीही तिचे जोगळेकरांच्याकडे जाणे-येणें चालूंच राहिलें. तिच्या कणांकणांतून जोगळेकर भरून राहिले होते. व्यवसायांत ती आतां तरबेज झाली होती. पुरुषांशीं कसें वागायचें, धक्के चपेटे कसे घ्यायचे नि द्यायचे हें समजूं लागलें. आपल्याकडे येणाऱ्या व्यक्तींचें पाणी तिला थोडेंफार जोखतां येऊं लागलें. आपलें स्त्रीत्व कसें व कोठें वापरावें याचें कौशल्य तिला हस्तगत झालें होतें. आरोपींच्या—टाऊटस्च्या सलगीच्या बोलण्याचें तिला कांहीं वाटेनासें झालें. व्यवसायांत तिला आतां बरें यश मिळूं लागलें होतें.

अजूनही कधीं कधीं जोगळेकर बोलवीत त्यावेळीं गिरिजा त्यांच्याकडे जाई. अजूनहि त्यांचें व्यक्तिमत्व तिला मोह पाडीत असे. त्यांची बोलण्याची मोहक पद्धत, हंसण्याची विशिष्ट लकब आणि त्यांचें प्रौढ पुरुषत्व, जाणीव असलेलें.....

तिचें जाणें कधीं—मधींवर आले त्याच सुमारास एस्. गोपीनाथरावाची ओळख—विशेष ओळख झाली. एस्. गोपीनाथराव दिसायला चार चौघांसारखाच होता. फारसें उठावदार कांहीं नव्हतें त्याच्या चेहऱ्यांत. त्याच्या सलगीचा अर्थ गिरिजेनें ताडला. एस्. गोपीनाथरावांबरोबर ती फिरूं लागली. तिला पुढील पायऱ्या क्रमानें माहीत होत्या. अनुभवल्या होत्या. सिनेमा, एखादें चांगलें हॉटेल, वरसोव्याच्या कॉटेजमध्यें एखादी रात्र. एस्. गोपीनाथरावाकडून तशी अपेक्षा करीत होती. असा तिचा अंदाज होता. पण एस्. गोपीनाथरावांनीं जेव्हां तिला लग्नाबद्दल विचारलें तेव्हां ती स्तंभितच झाली....

## नांदा सौख्यभरे



'दीपावली'ची मुखपृष्ठ छपाई करणाऱ्या फोर्टमधील 'साधना आर्ट'चे संचालक श्री. मेघजी भाई यांची कन्या सौ. सुभाषिनी हिचा शुभ विवाह श्री. शिवशंकर यांच्याशीं सिकंदराबाद येथें थाटामाटांत पार पडला त्या प्रसंगीं घेतलेले छायाचित्र.

लग्नाबद्दल तिनें आजवर विचारच केला नव्हता. कधीं जरूरही भासली नव्हती. एस्. गोपीनाथरावानें तिला जेव्हां विचारलें तेव्हां ती फक्त चकित झाली होती एवढेंच! एखादा अनुभवी वकील ज्याप्रमाणें पक्षकाराची हकीकत निर्विकारपणें ऐकून घेतो त्याप्रमाणें एस्. गोपीनाथरावाचें म्हणणें तिनें ऐकून घेतलें. त्या दिवशीं ती कांहींच बोलली नाहीं. 'विचार करते' एवढेंच सांगून सटकली होती.

घरी आल्यावर ती त ाचाच विचार करीत होती. लग्नाची आपणाला खरोखरच जरूर आहे का? कशासाठीं करायचें लग्न? रसदार, मधुर आंब्याची चव चाखल्यानंतर तसें फळ आपणास वरचेवर मिळावें म्हणून आपण झाड लावलेंच पाहिजे का? गिरिजा विचार करीत होती. हिशोब घालीत होती. जोगळेकरांनीं घालून दिलेल्या लोखंडी कठड्याच्या मर्यादेवर तिचें डोकें पुनः पुनः आपटत राहिलें. तिच्या अंतरांत काहूर माजले... आपलें वय सरलें. नव्हाळी संपली... जोगळेकर शेवटपर्यंत साथ देतील का? समजा आपण आजारी पडलों... येतील का ते शेजारीं बसायला?... त्यांची मुले बाळें मोठीं होत आहेत. त्यांना त्यांच्या संसाराची काळजी आहे. त्यांनीं जो गडगंज पैसा मिळविला आहे तो आपल्या मुलाबाळांसाठीं— बायकोसाठीं. त्यांत आपला वांटा नाहीं. आपण फक्त त्यांना कांहीं प्रसंगीं झालेल्या आनंदाचे वाटेकरी आहोत फक्त... आनंदच होता का तो? का एक नुसती फॅक्ट...?

ती एकदम दचकली.. फॅक्टच्या कल्पनेनेनं ती प्रथमच दचकली. एस्. गोपीनाथरावानं लग्नाची मागणी घातली ती एक नुसतीच फॅक्ट आहे का?... याबाबतींत जोगळेकरांचा सल्ला घ्यावा का?... तिला कांहींच कळेना. पण जोगळेकरांना या बाबतींत विचारावेसें वाटेना. आयुष्यांत प्रथमच तिला आपल्याजवळ गोपनीय कांहींतरी आहे असें वाटलें. तें जोगळेकरांच्या पासून लपवून ठेवायचं होतें. त्याबाबत सल्ला विचारायचा नव्हता. त्याची जपणूक आपणच करायची होती. जोगळेकरांना यांतलें कांहींच न सांगतां तिनं एस. गोपीनाथरावाला होकार दिला.

निमंत्रणाच्या पत्रिका छापून झाल्या तरी तिनं स्वतःहून जोगळेकरांना या बाबतींत कांहीं सांगितलें नव्हतें. आतां ती निमंत्रकांचे पत्ते लिहीत होती. 'छ' या आद्याक्षराचीं नांवे संपलीं होतीं. 'ज'चे पत्ते लिहावयाचे होते. जोगळेकरांचेच नांव प्रथम होतें. तिचें पेन तसेंच उघडे पडले होते. समोरची पत्रिका वाऱ्यानें थरथरत होती......

आपलं लग्न ठरल्याचं ऐकून काय वाटेल त्यांना? आनंद? कसला? सुटकेचा? कां असूया? कां आणखीन् कांहीं? कां नुसतीच स्थितप्रज्ञता? होय तेंच खरें. जोगळेकर जग ओळखणारे आहेत. व्यवहार जाणणारे आहेत. त्यांच्या कानांवर ही गोष्ट न घातल्याबद्दल त्यांना कांहींही वाटणार नाहीं. नेहमींचेंच हास्य तोंडावर खेळवीत ते 'कॉंग्रॅटस्' म्हणतील...

मग तिचं मन स्थिरावलें. हलकें फुलकें झालें. "एस्. गोपीनाथराव" या अक्षरांवरून फिरणारीं बोटें थांबलीं. तिनें बाजूला उघडे पडलेलें पेन हातीं घेतलें. सदैव स्मरणांत असलेला वसंतराव जोगळेकरांचा पत्ता तिनं पत्रिकेवर लिहायला सुरवात केली.. समोरची पत्रिका आतां थरथरत नव्हती.

• • •



Shilpi SOM 23 Mar.

# स्वस्तिक

## पर्फ्यूम्ड कॅस्टर ऑईल

अगदीं अवखळ केंसांना
देखील काबूत आणतें—इतकेंच
नव्हे तर दिवसभर ते
नीटनेटके ठेवतें.



रेशमी, मऊशार केंस...चमकदार,
सुंदर केंस...भरघोस,
सुगंधित केंस...दिवसभर
नीटनेटके रहातात. याचें
श्रेय स्वस्तिक पर्फ्यूम्ड् कॅस्टर
ऑईललाच द्यायला हवें.

**स्वस्तिक** ऑईल मिल्स लि. मुंबई.

